# इमले अक्षरतेचे,

## अर्थात अष्टाश्वमेध नाटक

लेखक: जयदीप चिपलकट्टी

अंक पहिला: पाने १-३१
अंक दुसरा: पाने ३२-५८
अंक तिसरा: पाने ५९-८६

(१६ जून, २०२१)

संपर्क: jaydeep.chipalkatti@gmail.com

# इमले अक्षरतेचे,

## अर्थात अष्टाश्वमेध नाटक

-जयदीप चिपलकट्टी

### अंक पहिला

(स्थळ: दिवाणखाना. संपूर्ण नाटक इथे घडतं. बाहेरचं जग, बंगल्याचा वरचा मजला आणि खालच्या मजल्यावरचा आतला भाग यांना जोडणारी अशी एकूण तीन दारं दिवाणखान्याला आहेत. अमुक पात्र अमुक प्रसंगी यांपैकी कुठल्या दारातून ये जा करतं हे संदर्भावरून स्पष्ट व्हावं.

दिवाणखान्यात एकोणीसाव्या शतकातल्या इंग्रजी पद्धतीचं शिसवी फर्निचर आहे. पायाखाली भारी गालिचा आहे. छताला झुंबर आहे, ह्यातला दिवा लावण्या-विझवण्यासाठी भिंतीलगत जाड दोर आहे. याखेरीज नेपथ्यासाठी गरजेच्या असलेल्या वस्तू पुढीलप्रमाणे: टेलिफोन, बुद्धिबळाचा मोठ्या आकाराचा भपकेबाज सेट, पुरुषभर उंचीची प्रशस्त अलमारी, भिंतीवर लटकवलेली लांब नळीची बंदूक, ड्रिंक्स कॅबिनेट, ग्रॅन्डफादर क्लॉक. यात पाचला एक मिनिट कमी आहे.

पडदा उघडतो तेव्हा पन्नाशीचा नोकर रावजी एका कुंच्याने फर्निचरवरची धूळ झटकताना दिसतो. पांढरा सदरा आणि धोतर असा त्याचा पेहराव आहे. फोन वाजतो. तो घेण्याची रावजीला विशेष घाई नाही. सावकाश चालत ग्रॅन्डफादर क्लॉककडे जाऊन तो निरखून वेळ पाहतो आणि मग फोन उचलतो.)

**रावजी:** गुड आफ्टरनून! नो-नो-नो-नो. आय मीन येस, धिस बॅरिस्टर जातेगावकर्स बंगलो. धिस मोस्ट डेफिनेटली बंगलो ऑफ एमिनंट बॅरिस्टर जातेगावकर फ्रॉम मिडल टेंपल. बट गुड इव्हिनिंग नो. गुड आफ्टरनून येस, बट गुड इव्हिनिंग नो. अकॉर्डिंग टू रेनमार्टिन्स मोस्ट लर्नेड गाईड ऑन द यूसेज ऑफ इंग्लिश लँग्वेज, टिल फाइव्ह ओ क्लॉक इट इज गुड आफ्टरनून. आफ्टर फाईव्ह ओ क्लॉक गुड इव्हनिंग इज ॲप्रोप्रिएट. (घड्याळाकडे वाकून पाहतो.) नाउ येस! नाउ ॲप्रोप्रिएट. नाउ मोस्ट गुड इव्हिनिंग सर!

येस-येस-येस. आय मराठी ऑल्सो स्पीक. आय अनस्टम्बल्ड मराठी स्पीक. आय द रावजी ऑफ मराठी लँग्वेज. नो-नो-नो. शिवाजी नो. रावजी. आय नॉट द शिवाजी ऑफ मराठी लँग्वेज. मी मराठी भाषेचा रावजी आहे. शिवाजी नाही. मराठी भाषेचे शिवाजी म्हणजे विष्णुशास्त्री चिपळूणकर. ते मेले. ते जुन्या पुण्यात राहायचे. इथे नाही. लकडी पुलाच्या पलिकडे जे कळकट्ट पुणं आहे तिथे ते राहायचे. आम्ही तिथे राहात नाही. आमच्या सरांचा बंगला नव्या पुण्यात आहे. डेक्कन जिमखान्यावर. नाही, सर घरी नाहीत. हो, सरांचा बंगला पुण्यात आहे, पण सर पुण्यात नाहीत. दि मोस्ट एमिनंट बॅरिस्टर जातेगावकर इज इन बॉम्बे. ही विल रिटर्न टु पूना इन द इव्हिनिंग बाय डेक्कन क्वीन. आपले कंत्राटदार मोटवानी आहेत ना, त्यांच्यावर लाच दिल्याचा आरोप आहे. त्यांची केस आहे बॉम्बे हाय कोर्टात. म्हणून गेलेत. ते एक झालं. आणि इथे पुणे मंडईत एक माथाडी कामगार संघ आहे, त्याच्यावर बेकायदा संप केल्याचा आरोप आहे. ती पण केस त्याच कोर्टात त्याच दिवशी आहे. सर इज किलिंग टू बर्ड्स इन वन स्टोन. दोन्ही केसेसची आर्ग्युमेंटस् एकापाठोपाठ करून ते परत येणार आहेत. पण दोन्हीत तसा चांगलाच फरक आहे बरं का! अल्दो दे आर किल्ड विथ वन स्टोन, दे आर नॉट बर्ड्स ऑफ वन फेदर. माथाडी कामगार म्हणजे एकजात लेकाचे भणंग. त्यामुळे त्यांची केस प्रो-बोनो आहे — सर त्यांच्याकडून पैसे घेणार नाहीत. पण मोटवानी काही भणंग नव्हेत; बक्कळ पैसेवाले आहेत. तेव्हा त्यांची केस ॲन्टिबोनो आहे — त्यांच्याकडून आमचे सर दाबून फी घेणार. असं ते एकूण आहे.

ओके देन. मला इथे बरीच कामं आहेत. तुमच्याशी बोलत बसलो तर कामं कोण करेल? ओके देन. उद्या या, परवा या, केव्हाही या. डेक्कन जिमखान्यावर 'तमसा' बंगला म्हणून विचारा. कुणीही सांगेल. 'त-म-सा'. काय तुम्ही तरी?! तुम्हाला तमसा नदी माहित नाही? अहो, टॉवर ब्रिजच्या खालून वाहते ती तमसा. आपल्या लंडनमधल्या जुन्या दिवसांची आठवण राहावी म्हणून सरांनी बंगल्याचं नावच तसं ठेवलं. त्याचं असं आहे की बाईसाहेबांचं नाव सावित्री. म्हणजे लग्नापूर्वीचं नाव गोदावरी, पण साहेबांनी लग्नात बदलून 'सावित्री' केलं. लग्नानंतरच्या पहिल्याच रात्री सर बाईसाहेबाना म्हणाले की आपल्याला दोन मुलं असणार. आणि तसंच झालं. बॅरिस्टरसरांचा होरा कधीही चुकत नाही. पहिला मुलगा झाला. त्याचं नाव 'तनय' ठेवलं. त्यानंतर सहा वर्षांनी मुलगी झाली. तिचं नाव 'मधुरा' ठेवलं. तनय-मधुरा-सावित्री म्हणजे 'त-म-सा'. आहे की नाही?

काय म्हणता? छे-छे! मी कसला जातोय? इथे सगळ्या घराचा डोलारा मीच पेललेला आहे. मला कुठे सवड होतेय ते लंडन आणि फिंडन बघायला? बट नूक-अॅन्ड-क्रॅनी ऑफ लंडन आय नो व्हेरी वेल. समजा मला सर नुसते म्हणाले की ‘चिसविक मॉलपासून टूट्वेंटीवन बी बेकर स्ट्रीटपर्यंत घेऊन चल’, तर एकाही बॉबीच्या डोक्यावरच्या घमेल्याला धक्का न लावता डोळे झाकून व्हिक्टोरिया हाकत सरांना घेऊन जाईन. एव्हरी पार्ट-अॅन्ड-पार्सल ऑफ द ग्रेट मेट्रॉपोलिस ऑफ लंडन आय नो व्हेरी वेल.

ओके देन. या मग. किंवा असं करा, आधी रीतसर पत्र पाठवा. तुमची केस काय आहे ते स्वच्छ शब्दांत लिहून कळवा. पत्र वाचून सर तुम्हाला सांगतील केस घेणार की नाहीत ते. काय? पत्ता? घ्या, पत्ता नीट लिहून घ्या: ‘बॅरिस्टर यदुनाथ वामन जातेगावकर, ‘तमसा’ बंगलो, डेक्कन जिमखाना, पूना-अपॉन-मुठा.’ गॉट इट? ओके देन. सरांनी अपॉइंटमेंट दिली तर या. तसेच नका येऊ. पण येणार असाल तर बंगला सापडायला अगदी सोपा आहे. ‘तमसा’ म्हणून विचारलंत तर कुणीही सांगेल. अक्रोडाच्या लाकडात ठसठशीत देवनागरी अक्षरांनी नाव लिहिलेलं तुम्हाला दिसेल. शेजारच्या बंगल्याचं नाव ‘श्रमसाफल्य’. पण ती खूण लक्षात ठेवू नका. डेक्कनवर ‘श्रमसाफल्य’ नावाचे किमान एक डझन बंगले आहेत. तेव्हा ती खूण लक्षात ठेवून काही उपयोग नाही. उगीच भरकटाल. ओके देन. गुड इव्हिनिंग.

(फोन ठेवतो.)

कुणीही लुंगेसुंगे उगीच फोन करत राहतात. सरांच्या नावाचा दबदबाच असा आहे की सगळ्यांना वाटतं आपली केस त्यांनीच घ्यावी. मग त्यांची फी काय, आपल्याला परवडेल का, त्यांचे बाकी अशिल किती आहेत याचा काही विचार नाही. पण ते असायचं ते असो. मी आपला सगळ्यांशी मऊपणाने वागतो. कुणाचं वकिलपत्र घ्यायचं आणि कुणाचं नाही हा निर्णय सरांचा. हां. तर इथे काय करत होतो मी? सफाई करत होतो. हा बुद्धिबळाचा सेट साहेबांनी जाकेस अॅन्ड सन्सकडून दोनशे गिन्न्या मोजून घेतला. याच्यावर धूळ चढलेली सरांना मुळीच खपत नाही. (कुंचा नाजुकपणे फिरवत मोहरे साफ करू लागतो.) आज रात्री ते परत येतील तेव्हा झुंबराच्या प्रकाशात कसा लखलखीत दिसायला हवा.

(मोठा मुलगा तनय आत येतो. त्याने जांभळ्या रंगाचा सिल्क शर्ट आणि गुलाबी रंगाची सलवार घातली आहे. पायात मोजड्या आहेत. केस भरघोस आहेत. आळोखेपिळोखे देतो.)

**तनय:** रावजी, अरे रावजी. चहा आण बाबा. मोठी मेहेरबानी होईल.

**रावजी:** उठलात का एकदाचे?

**तनय:** आत्ताच उठलो. अजून दात घासायचे आहेत. ते नंतरच केव्हातरी घासेन. चहा आण.

**रावजी:** आणतो. संध्याकाळचे पाच वाजताहेत म्हणजे आपल्या हिशेबाने झुंजूमुंजू झालंच आहे. व्हेन मॉर्निंग बिकम्स इव्हिनिंग इट इस ओन्ली प्रॉपर दॅट इव्हिनिंग बिकम्स मॉर्निंग.

**तनय:** मान्य आहे रे बाबा. पण नेमाने झोपून नेमाने उठायला मी काही अभ्यासू आणि कष्टाळू कॉलेजतरुण नव्हे. अभ्यास करून, कष्ट करून आयुष्यात मला काही मिळवायचं आहे का? नाही. जरी कष्ट केले तरी काही मिळणार आहे का? नाही. तशी धमक माझ्यात आहे का? नाही. मला महत्त्वाकांक्षा नाही. यापूर्वी नव्हती आणि आत्ताही नाही. मग निष्कारण सकाळी लवकर उठून आपल्या उर्वरित आयुष्याचा हा पहिला दिवस आहे असं स्वत:ला बजावून सांगून पुढे मी काय करणार आहे? काही नाही. म्हणून मग कालची रात्र अशीच काहीबाही वाचत विचार करत मनन करत जागून काढली. या निशा सर्वभूतांना तस्यां जागर्ति संयमी. शितावर जमलेली भुतं जेव्हा झोपलेली होती तेव्हा संयमाने निशापाणी करीत विश्वाची चिंता करीत मी आपला जागा होतो. ह्या चिंतेचं ओझं जेव्हा पेलवेनासं झालं तेव्हा श्रान्त आणि क्लान्त मनाने रामप्रहरी जो डोळा लागला तो हा आत्ता उठतो आहे. माझ्या उर्वरित आयुष्याची ही पहिली संध्याकाळ आहे. तेव्हा चहा घेऊन ये.

**रावजी:** निशापाणी केलंत हे मला ठाऊक आहेच. काल संध्याकाळी मी डीकॅन्टर भरून ठेवला होता तो आता बराच खाली गेलेला दिसतो आहे. तुम्ही त्याला संयम म्हणा हवं तर, पण डीकॅन्टरकडे पाहता तसं वाटत नाही.

**तनय:** अरे, संयम-संयम म्हणजे तरी शेवटी काय? निशापाण्याचा खळाळ असा जबरदस्त असतो की संयमाच्या खडकाची भुसभुशीत माती करून सोडल्याखेरीज त्याचं शांतवन होत नाही. तेव्हा त्या मातीतच देह टाकावा आणि ह्या खळाळातून उमटणाऱ्या अनाहत नादाची बेहोशी अंगावर लपेटून घ्यावी इतकंच काय ते शेवटी आपल्यापाशी उरतं:

कुशीत आली जेव्हा अलगद ओली उत्तररात्र
शरीर माझे अवघे बनले मदिरेचे पात्र

थोडक्यात सांगायचं तर काल जास्त झाली. तेवढं कबूल करतो.

**रावजी:** ही ओली बेहोशी की काय जी म्हणता ती स्वत:च्या खर्चाने साजरी झाली तर बरं होईल.

**तनय:** कबूल आहे बाबा, कबूल आहे. पण निदान या जन्मी ते होणार नाही. पैशांतलं मला काही कळत नाही. ते मला लागतात इतकंच कळतं. तेवढे जो कुणी देईल त्याचा मी आभारी असतो. आमचे आबा उर्फ बॅरिस्टर जातेगावकर यांच्या पैशावर मी जगत आलो आहे, तेव्हा त्यांचा आभारी आहे. त्यांनी आम्हाला जन्म दिला, आभारी आहे. पैसे देताहेत, आभारी आहे. स्वत्व मात्र दिलं नाही, पण आभारी आहे. आमच्या आबांनी ठरवूनच टाकलं होतं की आपण शरीराने पुण्यात आणि मनाने लंडनला राहायचं. डेक्कन जिमखान्यावर त्यांचा बंगला असणार आणि त्याचं नाव 'तमसा' असणार हे आमच्या जन्माआधीच ठरून गेलेलं होतं. त्यामुळे माझं नाव 'त' ने सुरू होणार हेही ओघाने आलंच. ह्या बेताला अनुसरून अस्मादिकांचं नाव ठेवलं काय तर मारे 'तनय'! म्हणजे 'मुलगा'! आपल्या मुलाचं नाव मुलगा ठेवावं इतकीच आमच्या आबांच्या लेखी आमची किंमत. 'बाबारे, तू खास कुणी नाहीस' असं मला सांगण्याचा हा त्यांचा मार्ग. पण ठीक आहे. जे आहे ते आहे. आभारी आहे.

**रावजी:** स्वत:ची किंमत स्वत: ठरवायची असते. द वर्ल्ड इज ॲज इज. मॅन हू इज नथिंग हॅज नो प्लेस इन इट. रिमेंबर दॅट.

**तनय:** I always remember that, Raoji. I never forget that. जीवनाची लढाई सुरू होण्यापूर्वीच ती हरलेला मी माणूस आहे. बाहेरच्या जगात मला स्थान नाही इतकं मला चांगलं ठाऊक आहे. ह्या घराच्या सांदीकोपऱ्यातच फक्त कुठेतरी माझी जागा आहे. आमच्या उच्चशिक्षित, धनदांडग्या बापाच्या जिवावर मी जगणार, यकृताला शिलिंगच्या नाण्याएवढी मोठ्ठाली भोकं पडेपर्यंत त्याच्या खर्चाने दारू पिणार आणि शेवटी मरून जाणार. हेच माझ्या नशिबी आहे. त्यात बदल होणार नाही. आबांनी हाकलूनच दिलं तर शेजारच्या बंगल्यात जागा मागेन. पण सकाळी साध्या भाताबरोबर फोडणीचं वरण आणि संध्याकाळी फोडणीच्या भाताबरोबर साधं वरण खाणारे ते निरुपद्रवी आणि पापभीरू लोक मला त्यांच्यात सामावून घ्यायचे नाहीत. तेव्हा जा रावजी, कषायपेय घेऊन ये, जेणेकरून तिच्यात पडलेल्या मक्षिकेप्रमाणे मला माझी दु:खं बुडवून टाकता येतील. पण ती तसली टी-सर्व्हिस वगैरे विलायती नखरे नकोत. सावित्री हे पवित्र नाव धारण करणाऱ्या अतिसात्विक स्त्रीच्या अंगावरील गर्भरेशमी नऊवारी साडीतून ह्या पृथ्वितलावर आम्ही पडलेलो आहोत. झग्यातून नव्हे. तेव्हा चहा नुसत्या कपात घेऊन ये. आबा तर इथे नाहीत ना?

**रावजी:** ते मुंबईला गेले आहेत. डेक्कन क्वीनने परत येतील.

**तनय:** उत्तम. म्हणजे त्यांच्याकडून पाणउतारा करून न घेता मला चहा पिता येईल. पण त्यात आता कंजुषी करू नकोस. काठोकाठ भरू दे प्याला, फेस भराभर उसळू दे!

**रावजी:** आणतो, पण कवित्व आवरा.

३

(कपाळाला आठ्या घालत रावजी आत जातो. तनय अलमारीतली पुस्तकं चाळतो, पण थोड्याच वेळात कंटाळून खिडकीबाहेर विमनस्कपणे पाहात राहतो. पोटात कळ येते आहे असं त्याच्या चेहऱ्यावर दिसतं, पण तो भाव चेहऱ्यावरून पटकन पुसून घेतो. बॅडमिंटनची उघडी रॅकेट हातात घेतलेली मधुरा येते. हिने खेळायचे कपडे घातले आहेत, पण लिपस्टिक लावली आहे आणि केस लांबसडक आहेत.)

**मधुरा:** मेरे प्यारे भैया!

**तनय:** मेरी प्यारी बेहेना! आलीस का क्लबातून? How was the tournament?

**मधुरा:** फॅन्टॅस्टिक! मस्त! सुपर! काय खेळलेय मी! अरे, ती फॅनी डिसूझा ना मॅचच्या आधी सॉलिड भाव खात होती. म्हणे माझी रॅकेट विलोवूडची आहे, मेड इन जलंधर आहे, यंव आहे आणि त्यंव आहे. मी म्हटलं बघतेच तुला. आज ना दादा, तिला मी लव्हगेमच दिला. अस्से एकेक स्मॅश मारले की तिला घेताच येईनात! (बॅडमिंटन खेळल्याचा अभिनय करते.) खटॅक-खटॅक-खटॅक-टॉक! नुसती जीव खाऊन पळतेय इकडून तिकडे. गेमपॉइंटला तिच्या नाकाडावरच शटल मारलं. फटॅक-टपॅक! फिफ्टीन-लव, गेम अ‍ॅन्ड मॅच मिस मधुरा जातेगावकर. क्लॅप-क्लॅप-क्लॅप! सॉलिड मज्जा आली. नंतर तिला मी माझ्या रॅकेटवरचा लोगोच दाखवला: Made in England by Appointment to His Royal Highness the Duke of Cambridge! काय पण तोंड उतरलं तिचं! दादा, you should have seen it ! नंतर कोच मॅडमनी कित्ती कौतुक केलं माझं. त्या म्हणाल्या की अशीच खेळलीस तर बॉम्बेला जिमखाना टूर्नामेंटमध्ये नक्की सिलेक्ट होशील. दादा, मी सिलेक्ट झाले ना तर पप्पा आणि तू दोघांनी पण माझा गेम बघायला बॉम्बेला यायचं. आपण चौपाटीवर मस्त भेळ खायची, एअर कंडिशनिंगमध्ये बसून सिनेमा बघायचा आणि मग कफ परेडला शॉपिंग करायचं! त्या रीना ओबेरॉयचा कसा कश्मीरी एम्ब्रॉयडरी केलेला आकाशी रंगाचा ड्रेस आहे ना अगदी तसाच मला पण पाहिजे. And I want new red shoes! ड्रेसवर काय मस्त दिसतील! (काल्पनिक ड्रेस चिमटीत उचलून धरून दिवाणखान्यात इकडून तिकडे मिरवत चालत जाते.) पप्पांच्या सुटाच्या खिशाला भोकच पाडणार आहे मी. But he loves me! He won't mind a bit. आणि त्यांना काय, मोटवानीसारखा आणखी एक क्लाएंट मिळाला की भोक पुन्हा आपोआप बुजेल.

**तनय:** Don't worry, मेरी बेहेना. We will go to Bombay together. पण आबांच्या खिशाला भोक पडेल का याची काळजी करू नकोस. त्याआधी माझ्या यकृताला भोक पडणार आहे. पिऊनिया व्हिस्की, जाई माझा झोक, यकृताला भोक, पडले गा!

**मधुरा:** झालं का तुझं सुरू?! काही भोकबीक पडत नाही. तू चांगला ठणठणीत आहेस. आणि पप्पांना सारखं आबा-आबा का म्हणतोस? किती घाटी आहेस! त्यांना आवडत नाही हे तुला माहित

आहे.

**तनय:** अगं, त्यांना आवडत नाही म्हणूनच म्हणतो. मी जीए कुलकर्णी वाचायला सुरुवात केली ना, तेव्हा त्यांचं संपूर्ण नाव काय असेल याबद्दल मला फार उत्सुकता होती. 'ए' म्हणजे एकनाथ असं मी ठरवून टाकलं होतं, पण 'जी' म्हणजे काय ते सुचेना. 'जीवाजी' असं एक सुचलं, पण ते बरोबर वाटेना. मग विचार केला 'जीमूतवाहन' असेल का? तू कल्पना कर: 'जीमूतवाहन एकनाथ कुलकर्णी' आत आहेत स्लॅश नाहीत अशी पट्टी बाहेर दारावर लावायची! शेजारी हबकतील की नाही? पण शेवटी एकदाचं कळलं: जीए कुलकर्णी म्हणजे गुरुनाथ आबाजी कुलकर्णी! त्यांच्या वडिलांचं 'आबाजी' हे नाव मला इतकं आवडलं की आपल्या बाबांचं मी तेच नाव ठेवून टाकलं. आता जरासे चडफडले, पण मी पडलो त्यांचा कुलदीपक. सांगणार कुणाला?! सारांश काय तर तुझे जे पप्पा तेच माझे आबा. मधुरा is to पप्पा as तनय is to आबा. After cross multiplying, मधुरा times आबा is equal to तनय times पप्पा. म्हणजे मधुरा times आबा minus तनय times पप्पा is equal to zero. A big big zero. माझ्या यकृतावर कोरला गेला आहे तेवढा मोठा झीरो! पण आता हे समीकरण कसं सोडवणार? Who will solve this equation?! And what is the point of solution when it leads to dissolution? समीकरण सुटताना विरघळत जाणारे कंस जर पुन्हा एकदा हातमिळवणी करून तुमच्या गळ्याभोवतीच वेढा देणार असतील —

(रावजी खाकरतो तसं तनयला भान येतं. मधुरा सुटकेचा निश्वास सोडते. रावजीच्या हातात चांदीची टी-सर्व्हिस आहे. 'हे काय?' असा चेहरा करून तनय रावजीकडे बघतो.)

**रावजी:** दोघांसाठी आणला आहे. तोंड वाईट करू नका. मुकाट्याने प्या. तुम्ही लाख म्हणाल मला नुसता कपात चहा आण म्हणून. आम्हाला तसं कसं करता येईल? या घराचं काही एक वळण म्हणून आहे की नाही? (मधुराला उद्देशून) टी फॉर टू, मिस जातेगावकर. विथ स्कोन्स ॲन्ड क्रीम. ऑल्सो कुकुंबर सॅन्डविचेस.

**मधुरा:** रावजी, तुला किती वेळा सांगितलं आहे: 'क्यूकंबऽ' असं म्हणायचं. 'कुकुंबर' नव्हे. तो काय औदुंबर आहे का?

**रावजी:** येस मिस, सॉरी मिस. परवा त्या गाडगीळमॅडम आल्या होत्या तेव्हा मी असंच म्हणालो. पण मी काय बोलतोय ते त्यांना कळलं नाही.

**मधुरा:** नाही तरी ती गाडगीळीण जरा बॅकवर्डच आहे. नवरा साधा डेप्युटी कलेक्टर आहे तर मिजास किती मारते! परवा क्लबात आली होती मारे बॅडमिंटन खेळायला. सिंगलची लॉबी आणि डबलची लॉबी कळत नाही आणि म्हणे मी बॅडमिंटन खेळते!

**रावजी:** येस, मिस.

**मधुरा:** रावजी, तू उगीच आगाऊपणा करू नकोस. You may go now. I will make the tea. इथे होस्टेस मी आहे.

**रावजी:** येस, मिस. (जातो. ती दिवाणावर बसून सराईतपणे चहा तयार करू लागते. तनय पुढे होऊन एक सॅन्डविच उचलतो.)

**मधुरा:** ई! कसला घाणेरडा वास येतोय?! दादिटल्या, आंघोळ केली नाहीयस ना?

**तनय:** आत्ताच झोपेतून उठलो. अजून दात घासायचे आहेत.

**मधुरा:** शी! तरीच शिळ्या दारूचा वास येतोय. असा कसा रे तू? सगळे पुरुष मेले असेच घाणेरडे असतात. Dirty fellows all and one.. अगदी किळस येते मला!

**तनय:** बबडे, फार शेफारली आहेस हं तू! तुला उजवून टाकून, लाल साडीच्या बोंग्यात कोंबून, हातात मसाला दुधाचा पेला सोपवून छपरी पलंगावर ढकलून द्यायला पाहिजे. झुळझुळीत सदऱ्यातल्या मिशाळ बाप्याने गच्चम मिठी मारली म्हणजे सगळी किळस कुठल्या कुठे पळून जाईल! मग अगदी लाजत लाजत दुसऱ्या दिवशी उखाणा घेशील:

पहाटेच्या साखरझोपेत होते गं मी कशी

सुभानरावांनी जवळ घेऊन टोचली मला मिशी!

**मधुरा:** ई! घाणेरडा आहेस! (चेहरा झाकून घेते.) मला लग्नच करायचं नाहीय. मी आपली तशीच राहणार. (स्वप्नाळू चेहऱ्याने) मला एक मुलगी असेल मात्र.

**तनय:** (चहा पिताना ठसका लागतो.) बबडे, लग्न नाही केलंस तर मुलगी कुठून होणार तुला?

**मधुरा:** मला नाही माहित. पण होईल.

**तनय:** अगं, अशी कशी होईल? नुसता तो झारा घेऊन बुंद्या पाडायला जातेस त्याऐवजी कोकशास्त्र वाचत जा जरा. इथेच अलमारीत कातडी बांधणीतली व्हिंटेज एडिशन असेल कुठेतरी. आबांनी चेरिंग क्रॉसहून आणलेली. म्हणून तर आपला जन्म झाला, बबडे!

**मधुरा:** शी! घाणेरडं बोलू नकोस! मला तसलं काही नको आहे. (खट्टू होते.) पण मला माझं असं मूल हवं आहे. (स्वत:मध्ये हरवून जाते.) दाद्या, मला एवढं म्हणतोस तर तूच पहिल्यांदा लग्न का नाही करत? एवढा मोठ्ठा घोडा वाढला आहेस तो. माझ्यापेक्षा सहा वर्षांनी मोठे आहात आपण दादासाहेब. क्यूमध्ये तुमचा नंबर आधी आहे.

**तनय:** कर, तू पण माझी चेष्टा कर! अगं, माझ्याशी कोण लग्न करणार? तुम्ही मुली म्हणजे सगळ्या इथून तिथून सारख्याच असता. तुम्हाला गाडी पाहिजे, बंगला पाहिजे, मानसन्मान पाहिजे, क्लबात मिरवायला पाहिजे म्हणून नुसतं संसाराचं सोंग आणता झालं. हे सगळं पुरवायला म्हणून फक्त तुम्हाला नवरा हवा असतो. शरीरसुखाचे चार चव्वल त्याच्या अंगावर फेकून हे सगळं तुम्ही घाऊक भावानं विकत घेता. सरसकट नुसतं बेगडी, बाजारू, मुलामा दिलेलं आयुष्य! अरे, शिसारी येते शिसारी मला तुमची! तुमच्यावर प्राण ओवाळून टाकून जो जीव लावतो त्याची तुम्हाला कवडीची किंमत नसते. जो पैसे मिळवू शकत नाही, ज्याच्या नावावर पार्टीला जाऊन मिरवता येत नाही तो पुरुष तुमच्या लेखी अगदी कुचकामी! काळ्याशार डोहात असा पाय टाकून शांत बसलेला औदुंबर तुमच्या लेखी भिकारी! कारण काय तर तुमच्या ह्या चकचकीत झगमगीत खोट्या दुनियेत तो रमत नाही म्हणून! नको. नकोच मुळी! मला यातलं काही नको. मी आहे तसाच बरा आहे —

नको क्षुद्र संभोग तो दुर्बळांचा
तुझी दूरता त्याहुनी साहवे

दूरच राहा माझ्यापासून! दूरच राहा! मला लग्न नको, प्रेम नको, काही नको. मूर्खांनो, द्विभार्याप्रतिबंधक कायदा कसला आणता? एकभार्याप्रतिबंधक कायदा आणा! राष्ट्राला त्याचीच आज गरज आहे! एकल्या वाटेवरी सूर माझा एकला —

(हे बोलत असताना तो तिच्यापासून दूर चालत जाऊन तिला पाठमोरा झाला आहे. ती मागून जाऊन त्याच्या खांद्यावर हात ठेवते.)

**मधुरा:** दादा, तू असा का रे वागतोस? का असा स्वत:ला दुखवून घेतोस? पप्पा आणि आई किती काळजी करतात तुझी. त्यांना वाटतं तू नीट अभ्यास करावास, पप्पांसारखं बॅरिस्टर व्हावंस, त्यांना अभिमान वाटेल असं काही करावंस. चारचौघात त्यांची मान खाली होईल असं वागू नयेस. दोघांचं किती प्रेम आहे तुझ्यावर. पण तू दारू पितोस, एवढ्या सोन्यासारख्या शरीराची हेळसांड करतोस यामुळे त्यांना किती त्रास होतो. आई तुझ्या काळजीपोटी रात्र रात्र रडत असते. का बरं असं तिच्या मनाला दु:ख देतोस?

**तनय:** पण मग मी काय करू? मी फार एकटा आहे गं. मला माझं असं कुणी नाही. (रडू लागतो.)

**मधुरा:** हे बघ, तू माझा मोठ्ठा दादा आहेस ना?! मग असं रडायचं नाही. डोळे पूस बघू. छान हसून दाखव मला. (हसतो.) आणि हे बघ. इतकी दारू नको रे पीत जाऊ! हे व्यसन म्हणजे माणसाला आतून पोखरून टाकतं अगदी. दादा, मी तुझी छोटी बहिण आहे की नाही?! पण आजच्यापुरती तुझी आई होऊन सांगते. ही दारू म्हणजे वास्तवापासून पळून जायचा एक भ्याड आणि भेकड मार्ग आहे. तसं नको करू. शहाण्यासारखा वाग. निरोगी हो. बलदंड हो. पुरुषासारखा पुरुष ना तू? मग असं रडतभेकत नाही जगायचं. आयुष्याला निधड्या छातीने सामोरं जायचं. आम्ही सगळे तुझ्या पाठीशी आहोत. कुटुंबाच्या प्रेमाची पाखर हीच शेवटी वैफल्याच्या कटुतेवर साखर म्हणून गुणकारी ठरते.

**तनय:** पण मला मरून जावंसं वाटतं गं.

**मधुरा:** वेडा कुठला! असं नाही बोलायचं. काही कुणी मरूनबिरून जात नाहीय. मी म्हटलं की नाही तुला, मला एक गोड मुलगी असणार म्हणून? मग तिचा तू मामा असणार की नाही? तिचे तू लाड करायचेस, तिला चित्र काढायला शिकवायचंस, कविता म्हणायला शिकवायचंस, रोज रात्री झोपताना तिला गोष्ट सांगायचीस! आणि तिचे डोळे मिटायला लागले की पापण्यांची हळूच पापी घ्यायचीस..

३

(दाराच्या फ्रेममध्ये बसवण्णा दिसतो. त्याच्या डाव्या हातात विडी, उजव्या हातात फुलांची परडी आणि डाव्या खांद्याला कापडी पिशवी आहे.)

**बसवण्णा:** कुणाची पापी घेतं म्हटलं तर मधुराताई?! आमची घेतं का? पाहिजे तितकं घ्या हो. आमचं काहीपण ऑब्जेक्षन नसतं. आमच्या गावात एक फादर होतं. आमचं फादर नव्हे हो. चर्चात राहतं ते फादर म्हटलं तर. ते फादर आम्हाला येशूचं शिकवण बोलून सांगायचं: एका गालाचं पापी घेतलं तर दुसरा गाल पुढे करा म्हणून. तेव्हापासून आम्ही पण तसंच करतं. (याला विडी उलटी ओढायची लकब आहे, म्हणजे जळतं टोक तोंडात धरून. आत येऊन फुलांची परडी आणि पिशवी टेबलावर ठेवतो.) हे पारिजातकचं परडी आणलंय. मॅडमच्या इव्हिनिंग डिव्होशनसाठी.

**मधुरा:** बसवण्णा, शी घाणेरड्या! इथून दूर हो बघू. आणि ती बिडी इथून बाजूला घे आधी. काय घाणेरडा वास आहे पण! तुम्ही सगळे पुरुष म्हणजे असेच: नुसते घामाचे आणि धुराचे वास.

**तनय:** बसवण्णा, लेका तू फार माजला आहेस हं!

**बसवण्णा:** अहो, आता माजायचंच की. आमचं प्रेष्टीज असतं की हो तसं. मायसोर कंट्री क्लबात मी चीफ गार्डनर होतं. माझं रोज असं रेडभडक असायचं बघा म्हणजे आल मायसोर स्टेट आफिसर्स ॲन्युअल कॉम्पिटिशनमधे सहा वर्षं फर्स्ट प्रैझ मिळवलं. तुमचं बॅरिस्टरसर मायसोर हायकोर्टात केससाटी आलं तेव्हा क्लबात रेसिडेन्ट होतं. ही वॉज सो इम्प्रेस्ड टू सी माय रोजबेड. मला म्हटलं यू

कम टू पूना विथ मी. माझं तिथे विराट बंगला असतं. मी सरांना बोलून म्हटलं की स्वामी, ननगे पूना ग्वत्तिला. मायसोर कंट्री क्लबाचं गार्डन करायचं ते सोडून बंगल्याचं गार्डन करायचं म्हणजे डिमोशन की हो. बट सर वाज इम्पॉर्च्युनेट. सर प्रपोज्ड की ड्रायव्हरची ड्यूटीपण तुलाच देतं. आय आस्क्ड सर की विच कार यू हॅव्ह. सर म्हटलं ओरिजनल इंग्लिश ऑस्टिन समरसेट असतं. देन आय सेड येस. नीन होगित्री स्वीकार बेकु. तेव्हापासून मी डबल ड्यूटी करतं. हिकडे पूना जिमखाना क्लबचं फॉर सेवन स्ट्रेट इअर्स फर्स्ट प्रैझ मिळवतं तर तिकडे डेक्कनवर ऑस्टिन समरसेट चालवतं. पूना ड्रैव्हिंग म्हणजे नुसतं वैताग माडी. सगळीकडे रोडवर नुसतं सायकली असतं नाहीतर टॉमी नावाचं अल्सेशियन असतं. बट आय ड्रैव्ह ग्रेसफुली. आय ॲम प्रौड ऑफ मायसेल्फ. तेव्हा जरा माजायचंच की हो. (विडीचा झुरका घेतो.)

**मधुरा:** शी! घाणेरडा! एकदा बिडीचं जळतं टोक घुसून जिभेला भोक पडेल तेव्हा कळेल.

**बसवण्णा:** अहो, बिडीचं काय हो ते? माझं जन्म निपाणीचं असतं. तिथलं बेबी म्हटलं तर मदर्स मिल्कनंतर एकदम टोबॅकोच सुरू करतं. आमचं टोबॅको आम्हाला कडकच लागतं की हो. कडक पाहिजे म्हटलं तर बिडीचं पापीच घ्यावं लागतं. विथ फुल्ल कान्सन्ट्रेशन गार्डनिंगचं काम करायचं तर बिडीचंच काय ते एक कंपॅनियनशिप असतं. कडक धूर आत घुसलं की रोज कसं एकदम रेडीरेड फ्लरिश होतं की हो. यू नीड ए रीअल मॅन टु ग्रो अ रोज.

(रावजी येतो.)

**रावजी:** यू डॅम फूल! इथे आत विडी ओढत आलास? काय घाण वास येतोय —

**बसवण्णा:** तुमच्या सरच्या पाईपचं ते ष्ट्रांग फ्रेग्रन्स चालतं तर विडी का नाही चालत म्हणतो मी? हे घ्या हो, पारिजातकचं परडी आणलं आहे. मॅडमला इव्हिनिंग प्रेयरला पाहिजे म्हणून. पारिजातक उगवायला गार्डनर कशाला पाहिजे हो? साधं माळी चालतंय की. मायसोर कंट्री क्लबचं चीफ गार्डनर असतंय की हो मी. पारिजातक उगवायचं म्हणजे वेष्ट ऑफ माय प्रेशस टॅलेंट झालं की हो. नशीब माझं वडाचं झाड उगवून त्याला सूत गुंडाळायला कापूस उगव म्हणून सांगितलं नाही. इतकं सतत डिवोशन म्हणजे कोण करणार?! सर म्हणून सहन करतंय बघा ते. ही इज अ व्हेरी पेशंट मॅन.

३

(सावित्रीबाई आत येतात. ह्या तुडतुडीत आहेत. हिरवं नऊवारी पातळ, अंबाडा आणि गळयात ठसठशीत मंगळसूत्र असा वेष आहे. ह्या संपूर्ण प्रवेशात तनय काहीच बोलत नाही. घुम्यासारखा दिवाणावर बसून राहतो.)

**सावित्रीबाई:** (हसून टाळ्या वाजवत) बबडी, तन्या आणि बसवण्णा! सगळे रिकामटेकडे मेले इथेच जमलेत! रावजी, अरे बाबा पानसुपारीचं तस्त आणि पिकदाणी घेऊन ये बरं! पाहुणचार कसा व्यवस्थित व्हायला हवा. आपल्या घरचं वळणच आहे तसं. पुण्यात राहात असलो म्हणून पुणेरी का वागायचं?

**मधुरा:** ई! मम्मा! पानसुपारी कसली खातेस?! तू म्हणजे अशी घाटी आहेस ना!

**सावित्रीबाई:** हे बाकी बरोब्बर ओळखलंस गं बाई! अगं, मेणोलीच्या त्र्यंबकशास्त्री नामजोशांची मी मुलगी. तुला सांगते, माझे खापरपणजोबा नशीब काढायला म्हणून पेशवाईत रत्नाग्रीहून मेणोलीला आले ते तिथ्थंच राहिले. त्यांचा पोरगा तिथ्थंच उपजला, पोराचा पोरगा तिथ्थंच उपजला आणि पोराच्या पोराचा पोरगा पण तिथ्थंच उपजला. तेव्हा तशी मी जन्माआधीपासून घाटीच की गं.

**मधुरा:** आहेस्सच मुळी. पण माझी लाडकी मम्मा आहेस. म्हणून आहेस तश्शी चालवून घेते तुला.

**सावित्रीबाई:** न घेऊन सांगशील कुणाला बबडे?

**बसवण्णा:** मॅडम, ते गार्डनमधलं पारिजातकचं परडी आणलं आहे.

**सावित्रीबाई:** हो हो. चाललेच आहे मी पूजेला. आणि मंडईत जाऊन अळीव, खोबरं, कोल्हापुरी गूळ आणि बदाम आणायला सांगितले होते ते सारं आणलंस का? आज रात्री बसून लाडू वळायचे आहेत मला.

**बसवण्णा:** येस मॅडम, ते सगळं पिशवीत ठेवलं आहे.

**मधुरा:** (तिच्या जवळ जाऊन) आई, केव्हा बाळंत होते आहेस गं? लब्बाडच आहेस. आम्हाला एवढं नवं भावंड येणार पण तू बिलकुल पत्ता लागू दिला नाहीस ना? (तिच्या पोटावरून हात फिरवते.)

**सावित्रीबाई:** हात मेले! म्हातारीची चेष्टा करतेस होय गं? मी कसली बाळंत होतेय या वयात? फार सोकावली आहेस बरं तू. आता मीच तुझ्यासाठी एक गोरागोमटा पोरगा शोधून देणार आहे. दोघं मिळून लगेच कामाला लागा आणि मांडीवर मुतायला एक छानसा नातू द्या मला. (तिला जवळ घेते.) ह्या तन्याला सांगून सांगून थकले पण तो काही लग्नाचं मनावर घेत नाही. बघ कसा शुंभासारखा कोपऱ्यात तोंड खुपसून बसलाय. माझ्याशी एक शब्द तरी बोलतोय का बघ! आता तुझ्यावरच सगळी भिस्त आहे गं बाई.

**मधुरा:** असं गं काय आई?! मी नाही जा —

**सावित्रीबाई:** अगं वेडाबाई, 'मी नाही जा' काय? इतकी घोडी वाढलीस तरी अल्लडपणा गेला नाही तुझा. मी तुझ्या वयाची होते तेव्हा पदरात एक पोर पडलेलं होतं.

**मधुरा:** (तनयला वेडावून दाखवत त्याच्या तोंडासमोर ओवाळते.) त्या पोरानं असे काय दिवे लावलेत ते दिसतंच आहे.

(सर्वत्र अवघडलेली शांतता पसरते. फोन वाजतो.)

**सावित्रीबाई:** यांचाच असणार. मीच घेते — हॅलो. न्हायीत, बालिष्टरसर घरी न्हायीत. म्या त्यांची गावाकडनं आनलेली बाईल बोलत्येय. सर ममईला गेल्यात. कोडतात दोन केसी हरून मग येत्याल. काय म्हनता? बालिष्टरसरच बोलताय? अगं बया! आवाज वळिकलाच न्हायी की हो म्या.. (खळखळून हसत) बोला! डेक्कन क्वीननेच येताय ना? (बराच वेळ ऐकत राहात) ठीक, ठीक. रावजीला सांगून ठेवते. अहो ऐका, तो जमशेद भेटेल तुम्हाला. त्याला म्हणावं बायकोला वेळेवर दवाखान्यात नेण्यात हलगर्जीपणा करू नकोस. वेडा पारशीपणा दाखवायची ही वेळ नव्हे. (आणखी

थोड्या वेळाने) हो, हो. ते काय तुम्ही द्यालच. सढळ हाताने द्या मात्र. बिचारा गरीब आहे हो. हे पारशी मेले गब्रू तरी असतात नाहीतर गरीब तरी असतात. अधलंमधलं काही नाही. (आणखी थोड्या वेळाने) बरं, बरं. अहो, त्यात काय एवढं मेलं? विलायतेत होतात तेव्हा तीन वर्षं नाही का वाट पाहिली मी? (आणखी थोड्या वेळाने) बरं, बरं. ठेवते. या तुम्ही.

**मधुरा:** तू म्हणजे अगदी जगाची काळजी वाहतेस बाई! हा जमशेद कोण आता?

**सावित्रीबाई:** अगं, तो डेक्कन क्वीनमध्ये खानसामा आहे. तुझ्या पप्पांची आणि त्याची जुनी ओळख आहे. दर खेपेला यांना मावा केक आणून देतो. त्याच्या बायकोला नववा म्हैना लागलाय आता. पुढच्या वेळी हे मुंबईला जातील तेव्हा अळवाचे लाडू पाठवीन त्यांच्याबरोबर. म्हणून तर हे एवढं सामान मागवलं. बरं का रावजी, सरांचा फोन आला होता.

**रावजी:** हो, ते कळलंच.

**सावित्रीबाई:** आगाऊपणा करू नकोस. माथाडी कामगारांचा खटला जिंकले म्हणे. जिंकतील नाहीतर काय. फर्डं इंग्रजी बोलून जज्जाची कानशिलं पांढरी केली असतील. तेव्हा स्टेशनवरून परस्पर कामगार कचेरीतच मीटिंगला जाणार आहेत. जेवणबिवण तिथंच करून येतील. बोकड खाणार असतील मेले. नंदिनीपण आहे त्यांच्याबरोबर. तेव्हा मी यांना म्हटलं की तिला रात्री इथेच घेऊन या. इतक्या उशीराची लेडीज हॉस्टेलात परत कुठे जाईल ती? उद्या रविवारच आहे. झोप घेऊन सावकाश दुपारचं जेवणबिवण करून मग जायची तेव्हा जाईल. तेव्हा मी काय म्हणते रावजी, नीट ऐक. तिच्यासाठी गेस्ट बेडरूम साफसूफ करून घे.

**रावजी:** ती नेहमी साफसूफच असते मॅडम. आपल्या घराचं वळणच तसं आहे.

**सावित्रीबाई:** आगाऊपणा करू नकोस. गेस्ट बेडरूम पुन्हा साफसूफ करून घे आणि मधुरेचा एखादा चांगलासा गाऊन तिला झोपताना घालायला काढून ठेव. (मधुराला उद्देशून) चालेल ना गं तुला? ती मेली लेडीज हॉस्टेलात राहणारी झुंजार पत्रकारीणबाई आहे. माझ्या काकूबाई थाटाच्या साड्या काही नेसायची नाही.

**मधुरा:** (गोरीमोरी होत) इश्श! चालेल की.

**सावित्रीबाई:** आता यात 'इश्श' करण्यासारखं काय आहे गं? ती काय पुरुष आहे? तुम्हा अलिकडच्या पोरींना 'इश्श' केव्हा वापरायचं हे पण मीच शिकवायचं का? बरं, मी येते आता. दर शनिवारचा खुन्या मुरलीधराचा नेम असतो माझा. (फुलांची परडी उचलते.) रावजी, ते लाडवांचं सामान स्वयंपाकघरात नीट ठेव. बसवण्णा, मंडईचा हिशेब काय झाला तो रावजीला सांगून ठेव.

**बसवण्णा:** येस मॅडम. फोर्टी नाईन रुपीज ट्वेन्टी फाईव्ह पाईस लागले. चेंजपण पिशवीतच ठेवलं आहे.

**सावित्रीबाई:** दुकानदारानं मागितले तेवढे पैसे तडकाफडकी देऊन टाकले असशील. तू तरी काय तुझ्या सरांचाच ड्रायव्हर.

**बसवण्णा:** नो मॅडम. मंडईत जोराचं घासाघीस केलं. हे पुण्याचं दुकानदार म्हणजे - व्हाट इज द वर्ड - नाट थीफ अॅज सच. हां! हे पुण्याचं दुकानदार म्हणजे एक नंबरचं भामटा असतं. नॉन-पूनाऐट गिऱ्हैक दिसलं की काय पण रेट सांगतं. पण मी निपाणीचं असतं हे त्या पाप बिचाऱ्याला माहितच नसून नसतं! देन आय सेड टु मैसेल्फ — अडिगी वेंडु प्रामाणिक मनुष्यं तरीं. तू पुण्याचं भामटा असलं तर मी निपाणीचं लखोबा लोखंडे असतं. रेट पाडून घेतलं आणि वर त्या दुकानदारालाच एक बनावट पावली खपिवलं.

**सावित्रीबाई:** चांगलं केलंस हो. तू तरी काय तुझ्या सरांचाच ड्रायव्हर. वकील आणि भामटे. दोन्ही मेले एकाच माळेचे मणी. चला, मला उशीर होतोय बाई.

**बसवण्णा:** पण मॅडम, कशाला तुम्ही इतकं धोका पत्करून तिकडे नदीच्या पलिकडे जातं म्हणतं मी. ओल्ड पूना इज अ व्हेरी डेंजरस प्लेस. ते मुरलीधर स्वत:च एक मर्डरस असतं! आणि देऊळच्या बाजूला सगळं नुसतं भामटा असतं, बुधवारातलं ते वाईट-साईट बाई असतं. व्हेरी डेंजरस प्लेस. मी म्हणतो हितेच डेक्कन जिमखान्यात एक देऊळ शोधून सोडा की. डेक्कन इज व्हेरी सेफ. सगळीकडे

नुसतं अल्सेशियन कुत्रा हिंडत असतं. भामटा हिम्मतच करायचं नाही इथे यायचं.

**सावित्रीबाई:** हात मेल्या. मला रे कसली भामट्यांची भीती दाखवतोस?! माझे खापरपणजोबा मेणोलीच्या वाड्यात कारकून होते. तिथे खुद्द नाना फडणवीसालाच हिशेबात कापायचे. त्याच्याकडे येणाऱ्या सगळ्या वाईट-साईट बायांची बिदागी ह्यांच्याच हातून तर जायची. रंगीला इतके द्यायचे न कमळीला तितके द्यायचे. त्यातसुद्धा रुपयातले दोन आणे ह्यांच्याच खिशात पडायचे. तेव्हा सारौंश काय तर मला फसवणाऱ्या भामट्याची आयशी अजून जन्माला आलेली नाही. चला, येते मी. बसवण्णा, तू गाडीत पेट्रोल भरून हवा भरून तयार ठेव. कामगार कचेरीतून फोन आला की तिथे जाऊन त्या दोघांना घेऊन ये. (बसवण्णा जातो.) आणि शुंभांनो, तुम्ही दोघे पटापट आंघोळी करून घ्या. काय पण पोरं दिलीत मला तुमच्या बापानं. आणि तन्या, तू आधी दात घासून घे रे बाबा. शिळया दारूच्या वासात घामाचा वास मिसळून मळमळायला लागलंय मला इथे. जा! निघा!

**मधुरा:** मम्मा, तू म्हणजे ना कजाग आहेस अगदी! (फुरंगटून पाय आपटत निघून जाते.)

**सावित्रीबाई:** बेटा तनय, आता मी जास्त काही बोलत नाही. आंघोळ करून घे बेटा. आणि दुपारी मी तुपातला शिरा केलाय तो थोडासा खाऊन घे. देवळातून परत आले की तू, मी आणि बबडी एकत्र जेवायला बसूयात. एवढं कर बाबा माझ्यासाठी. म्हाताऱ्या आईला उगीच त्रास नको देऊस.

**तनय:** मला भूक नाहीय. (निघायला उठतो, पण पोटात कळ येते. ती लपवण्यासाठी एक मोठ्ठालं पुस्तक पोटाशी धरतो.) हे इथेच विसरत होतो. (हळूहळू चालत निघून जातो. सावित्रीबाई त्याच्या मागोमाग दाराच्या चौकटीपर्यंत जातात आणि डोळ्याला पदर लावतात.)

**सावित्रीबाई:** रावजी —

**रावजी:** येस मॅडम.

**सावित्रीबाई:** सर यायच्या आत तो डीकॅन्टर पुन्हा पहिल्यासारखा भरून ठेव.

**रावजी:** येस मॅडम.

**सावित्रीबाई:** तुझे सर आणि नंदिनी रात्री उशीरा येतील. दिवसभर कोर्टकचेऱ्या आणि मीटिंगा करून दमून आलेले असतील. गाडीचा आवाज आला की ताबडतोब दार उघडायला जा. त्यांचा खोळंबा करू नकोस. जाते मी. (फुलाची परडी उचलून सावित्रीबाई जातात.)

**रावजी:** (स्वत:शीच, मान हलवत) ऑस्टिन सॉमरसेटचा कधी आवाज येतो का?

**सावित्रीबाई:** आगाऊपणा करू नकोस. इथून ऐकू येतंय मला. (रावजी जीभ चावतो.) पण आता जातेच रे..

३

(रावजी बसवण्णाने ठेवलेली पिशवी उचलतो. त्यातल्या एका रुमालाच्या पुरचुंडीतली मोड बाहेर काढतो आणि ती नीट मोजून अलमारी उघडून एका डबीत ठेवून देतो. त्याच अलमारीतून एक भपकेबाज कातडी बांधणीची कीर्द-खतावणी आणि फाउंटन पेन बाहेर काढतो. पानावर आकडेमोड करता करता..)

**रावजी:** फोर्टी नाईन रुपीज ट्वेंटी फाईव्ह पाईस. एकूणपन्नास पूर्णांक पंचवीस शतांश गुणिले अठरा म्हणजे आठशे शहाऐंशी पूर्णांक पाच दशांश. आठशे शहाऐंशी भागिले दोनशे चाळीस म्हणजे तीन पूर्ण आणि बाकी राहिली एकशे सहासष्ट. एकशे सहासष्ट भागिले बारा म्हणजे तेरा पूर्ण आणि बाकी दहा. झालं तर. अळवाच्या लाडवांचे साहित्य घेतले. खर्च: तीन पाउंड, तेरा शिलिंग, दहा पेन्स, दोन फार्दिंग. (इतकी नोंद करून पेनसह कीर्द-खतावणी व्यवस्थित परत ठेवतो आणि अलमारी बंद करून निघून जातो.)

३

(दिवाणखान्यातल्या घड्याळात अकराचे टोले पडतात. झुंबरातले दिवे उजळलेले आहेत. नंदिनी आणि बॅरिस्टर जातेगावकर दाराच्या फ्रेममध्ये दिसतात. नंदिनी निळी किनार असलेली पांढऱ्या

रंगाची साडी नेसलेली आहे. खांद्याला शबनम पिशवी आणि पायात कोल्हापुरी चपला आहेत. बॅरिस्टर थ्री-पीस सूटमध्ये आहेत. पायात पॉलिश केलेले काळे बूट आहेत.)

**बॅरिस्टर:** After you!

(नंदिनी आधी येते आणि तिच्यामागून बॅरिस्टर येतात.)

**बॅरिस्टर:** बस, नंदिनी. सकाळपासून आपली धावपळ खूप झाली. पण कामगार संघाचा निकाल मनासारखा लागला हे उत्तम झालं. सन्मानाने जगता यावं यासाठी वेळप्रसंगी संप करण्याचा कामगारांना घटनात्मक हक्क आहे असा निकाल हायकोर्टाने दिला. फार चांगलं झालं.

**नंदिनी:** येस, सर. तुम्ही फार ब्रिलियंट आर्ग्युमेंट केलंत सर. जस्टिस नरीमन म्हणजे एरवी अगदी निर्विकार माणूस. पण तोही भारावून गेलेला दिसला.

**बॅरिस्टर:** तुला सांगतो, मी विशेष असं काहीही केलं नाही. (बोलता बोलता टाय सैल करून स्वत:साठी एक स्कॉचचा पेग सावकाशीने ओतून घेतात. पण हे करण्याआधी एका छोट्या क्रिस्टल ग्लासमध्ये शेरी ओतून नंदिनीला देतात.) Some cream sherry for you. (ती ग्लास ओठाला न लावता तसाच समोर ठेवते. मात्र बॅरिस्टर स्कॉचचे घुटके घेत राहतात.) अशा हक्काला घटनेत आणि कायद्यात अधिष्ठान आहे इतका साधा मुद्दा मी कोर्टाला पटवून दिला. पण नंदिनी, एकोणीसशे एकवीस सालच्या बकिंगहॅम ॲन्ड कर्नाटक मिल्समधल्या संपाबद्दल तू जी कात्रणं शोधून काढलीस त्यांचा मात्र आपल्या आर्ग्युमेंटला बळकटी आणण्यासाठी खूप उपयोग झाला. जस्टिस नरीमननी आपल्या जजमेंटमध्ये म्हटलं सुद्धा की 'The historical data uncovered by the indefatigable journalist Ms Nandini Gokhale has proved to be of immense value et cetera et cetera.. '

**नंदिनी:** काय लाजवताय सर.

**बॅरिस्टर:** लाजवत नाही, तुला फक्त तुझ्या वाट्याचं श्रेय देतो आहे. पण प्रांजळपणे सांगायचं तर

माझ्या पोटात जराशी बाकबूक होतीच. अगं, जस्टिस नरीमन म्हणजे इनर टेंपल. मी मिडल टेंपल. आम्हा दोघांची लंडनमधली जुनी खुन्नस! तेव्हा म्हटलं म्हातारा तीच तेवढी लक्षात ठेवून बसतो की काय! पण तसं काही झालं नाही. शेवटी न्यायाची बाजू खरी ठरली. मी म्हणेन की असे न्यायाधीश जोपर्यंत न्यायासनावर आहेत तोपर्यंत ह्या देशाची अगदीच वासलात लागलेली नाही. असेंब्लीत बसून तंबाखू चघळणाऱ्या गावंढळ खाबूंच्या ताब्यात तो पूर्णपणे गेलेला नाही. थोडासा तुकडा अजून कुठेतरी शिल्लक आहे. पण आम्ही आता थकत चाललो. आमची उमेद संपत चालली. आता तुमच्या नव्या पिढीवरच आमच्या सगळ्या आशा केन्द्रित झालेल्या आहेत.

**नंदिनी:** असं म्हणू नका सर. उलट तुम्ही आम्हाला स्फूर्तिस्थानी आहात. कायद्याचं आणि घटनेचं सखोल ज्ञान असलेले वकिल म्हणून तुमचं केवढं नाव आहे सर.

**बॅरिस्टर:** तू असं म्हणतेस हा तुझा मोठेपणा झाला, पण यात माझं श्रेय फार थोडं आहे. पहिल्यापासून आम्ही घरचे तसे बरे होतो. वडिलोपार्जित जमीनजुमला थोडाफार होता; मागे भावंडं कुणी नाहीत, त्यामुळे त्यांच्या जबाबदाऱ्या नव्हत्या. इतकं सगळं पाठबळ होतं म्हणूनच मला इंग्लंडला पाठवणं बाबांना शक्य झालं. सासऱ्यांचाही हातभार लागला. ज्याला वकिली डोकं म्हणतात ते सुदैवाने मला मिळालेलं आहे, त्यामुळे तिथून शिकून आल्यानंतर ह्या क्षेत्रात थोडंफार नाव झालं, पैसा मिळाला. पण नंदिनी, याबाबतीत माझ्याइतके भाग्यवान सगळे नसतात हे मी विसरलेलो नाही. स्वतःच्या कुटुंबाला उर्जितावस्था यावी म्हणून जिवापाड कष्ट करणाऱ्या, हातावर घट्टा उठवून घेणाऱ्या माणसांबद्दल मला कणव वाटते, त्यांच्या हक्कांसाठी झगडावंसं वाटतं यामागचं कारण इथे कुठेतरी आहे.

**नंदिनी:** पण तुम्हाला एक विचारू सर? असं असेल तर मोटवानीसारख्या भ्रष्टाचारी माणसाचं वकिलपत्र तुम्ही का घेता? अशा माणसाला कायद्याच्या कचाट्यातून सोडवण्यासाठी तुम्ही आपली कुशाग्र बुद्धी का खर्ची घालता? याची तुम्हाला कुठे बोच नसते का? सॉरी सर, लहान तोंडी मोठा घास घेते आहे, पण विचारल्याखेरीज राहवत नाही म्हणून विचारते.

**बॅरिस्टर:** असते ना, बोच असतेच. नोटांची मऊमऊ थप्पी खाली अंथरली की ती बोच जराशी कमी होते इतकंच. पण बोच अजूनही असते. या व्यवसायात कितीही पावसाळे काढले, स्वतःची कातडी

कितीही जाड करून घेतली तरी ती पूर्णपणे जात नाही. लंडनला असताना आम्हाला क्रिमिनल लॉ शिकवणारे एक विद्वान प्राध्यापक होते: प्रोफेसर जॉन अॅशवर्थ नावाचे. नेहमी बो बांधायचे, टाय नाही. नेमका हाच प्रश्न त्यांना मी एकदा विचारला होता. ते मला म्हणाले होते की तुला पुस्तकी उत्तर देतो, पटतं का पाहा. तर नंदिनी, आता तेच पुस्तकी उत्तर मी तुला देतो. पटतं का पाहा.

**नंदिनी:** सांगा सर.

**बॅरिस्टर:** मी म्हणेन की मोटवानी भ्रष्टाचारी आहे की नाही हे ठरवण्याचं काम माझं नाही. सरकारी यंत्रणेने त्याच्यावर भ्रष्टाचाराचा आरोप केलेला आहे इतकं मला मान्य आहे. पण तो आरोप अजून सिद्ध झालेला नाही. जोपर्यंत तो सिद्ध होत नाही तोपर्यंत न्यायासनासमोर स्वत:चा बचाव करण्याचा कायदेशीर हक्क मोटवानीला आहे. आता असं पाहा की कायदा ही वस्तू एखाद्या प्रचंड जुनाट राजवाड्यासारखी आहे. हा राजवाडा एकाच वेळी एकाच माणसाने बांधलेला नाही. इकडचा सज्जा एका शतकात एकाने बांधला, तिकडचं दालन दुसऱ्या शतकात दुसऱ्या कुणीतरी बांधलं असा तो एकूण प्रकार आहे. त्यामुळे ह्या राजवाड्यात शिरलेला माणूस म्हणा, किंवा ढकलला गेलेला माणूस म्हणा, एकदा आत गेला की वाट चुकणार हे नक्की. पण असं जर असेल तर आत आलेल्या माणसाचं बोट धरून त्याला घेऊन जाणारा कुणीतरी वाटाड्या पाहिजे. हे काम मी करतो. आता हा वाटाड्या जितका निष्णात तितकी तो बिदागी जास्त मागणार हे साहजिक आहे. तर एकूण मी पुस्तकी उत्तर म्हणालो ते हे!

**नंदिनी:** थोडंसं पटलं, सर.

**बॅरिस्टर:** (हसत) तू चाणाक्ष आहेस हे मी केव्हाच हेरलेलं आहे. मलाही ते पुरतं पटलेलं नाहीच. पण शेवटी होतं काय की तत्त्व आणि व्यवहार यांची कुठेतरी तडजोड ही करावी लागते. ह्या मोटवानीबरोबर मी काव्यशास्त्रविनोद करत बसणार नाही, पण त्याच्याबरोबर काम करायचं म्हणजे मनातल्या मनात नाक धरून का होईना पण ते पार पाडावं लागतं. तेवढं मी करतो. तेव्हा एकूण मी काय म्हणतो नंदिनी, की हा आपला पैसेबाज पण भोळाभाबडा मोटवानी राजवाड्यात भरकटून हरवू नये इतकी दक्षता मी घेतो आहे. याबद्दल मला जी रीतसर बिदागी मिळते, त्यातला अल्पसा हिस्सा खर्च करून ही स्पॅनिश शेरीची बाटली मी विकत घेतली आहे. तुला ती चाखून

बघायला हरकत नाही. आजच्या दिवसात तू खूप झुंजारपणा केलेला आहेस, तेव्हा आता थोडी चैन केलीस तर तुला कुणी बोल लावणार नाही.

**नंदिनी:** (चाखून बघते.) चव छान आहे! (पुन्हा चाखून बघते.) तुम्ही माझ्या सवयी बिघडवताय सर. अशा गोष्टी माझ्या पगारात मला परवडत नाहीत. (थांबून) लहान होते तेव्हा आमच्या घरी काही नव्हतं. वडिल लवकर गेले. आई साधी नर्स होती. तिचा सगळा वेळ काबाडकष्टांत जायचा. फार त्रासलेली असायची. तिची इच्छा होती मी मोठ्या घरात पडावं अशी. ही मी पत्रकार-बित्रकार झाले ना, ते काही तिला आवडलं नव्हतं सर. ती म्हणायची पोरीच्या जातीनं सासरचे गाकर भाजावेत. लष्करच्या भाकऱ्या भाजू नयेत. पण मला माझं काम आवडतं. खूप लोक भेटतात. खूप बघायला मिळतं.

**बॅरिस्टर:** पण अशी पोटात आग असलेली तुझ्यासारखी कुणीतरी आहे हे बघून बरं वाटतं. ती नसेल ना तर जगण्यात काही मजा नसते. माझी दोन्ही पोरं तशी नाहीत. तनयनं फार निराशा केली. अहोरात्र दारूच्या नशेत राहून वैफल्याच्या आहारी जाऊन उभ्या आयुष्याची माती करून घेतली. मन लावून कधी अभ्यास केला नाही की आईबापांनी तळतळून सांगितलेलं ऐकलं नाही. सबब काही नव्हती. सगळ्या सुखसायी होत्या, कुटुंबाचं प्रेम होतं. तुला सांगतो नंदिनी, यशस्वी माणसाच्या हृदयात सर्वात खोलवर रुतणारं शल्य कोणतं असेल तर ते म्हणजे पोटचा पोरगा नालायक निपजणं.

**नंदिनी:** असं म्हणू नका सर. त्याला समजून घेणारं कुणी मिळालं तर अजूनही तो यातून बाहेर पडू शकेल.

**बॅरिस्टर:** त्याला समजून घ्यायचा मी काही थोडा प्रयत्न केला का? पण नाही. बापाशी काही बोलायचं नाही, बापाला काही सांगायचं नाही असं जे एकदा त्याने एकतर्फी ठरवून टाकलं ते टाकलं. काय त्याच्या मनात चालत असतं काही कळत नाही.

**नंदिनी:** तुमच्यासमोर यायची त्याला लाज वाटत असेल सर.

**बॅरिस्टर:** असेलही तसं. त्याच्या भावना मी समजू शकतो कारण त्याला मुलगा म्हणायची मलाही

लाज वाटते. पण जाऊ दे तो विषय. काही प्रश्न निधड्या छातीने तोंड देऊन सोडवायचे असतात, तर काही प्रश्न असे असतात की त्यांच्याकडे मुर्दाडपणे पाठ फिरवल्याखेरीज ते सुटत नाहीत. चल बेटा. उशीर झालाय. रावजीने तुझ्यासाठी गेस्ट बेडरूम तयार ठेवली असेल. छान आराम कर. मुळीच लवकर उठू नकोस. उद्या ब्रेकफास्टला भेटू.

**नंदिनी:** (शेरी पिऊन टाकत) Yes sir. Good night.

**बॅरिस्टर:** Good night, नंदिनी. (जाताना दोर खेचून झुंबरामधला दिवा विझवतात.)

३

(दुसऱ्या दिवशीची सकाळ. रावजी बटलरच्या वेशात आहे. सकाळी आलेल्या 'टाईम्स ऑफ इंडिया'च्या अंकाला इस्त्री करतो आहे. बॅरिस्टर खुर्चीवर बसून एक जाडजूड ग्रंथ वाचताहेत. त्यांच्या अंगात सिल्कचा महागडा गाऊन आहे. तोंडात पाईप आहे. दाराच्या फ्रेममध्ये सावित्रीबाई आणि डॉक्टर दिसतात. डॉक्टर साठीचे आहेत. अंगात सफारी सूट आहे आणि गळ्यात स्टेथोस्कोप. हातात ब्रीफकेस. सावित्रीबाई साध्या साडीत आहेत.)

**बॅरिस्टर:** गुड मॉर्निंग डॉक्टर, या.

**डॉक्टर:** अहो, येणारच! रविवारी सकाळी बॅरिस्टर जातेगावकरांकडे ब्रेकफास्टला यायचं हा आमचा इतक्या वर्षांचा वहिवाटीचा हक्कच आहे मुळी! तेव्हा आम्ही येणारच. (बसतात.) मी काय म्हणतो की सरळ कूळकायदा लागू करून तुमच्या डायनिंग टेबलाची एका खुर्ची मी चक्क माझ्या नावे करून घेतो. बघा चालतं का! माई, इतकी वर्षं बॅरिस्टरांशी मैत्री असल्यामुळे कायद्यातल्या खाचाखोचा आम्हालाही थोड्याशा समजायला लागल्या! काय?! हो की नाही?

**सावित्रीबाई:** (बॅरिस्टरांना उद्देशून) मी डॉक्टरांना म्हटलं की सरांना एकदा तपासून घेतलेलं बरं. सुखाचा जीव दु:खात घालून उगीच तिकडे मुंबईला जायचं. तिथे कोडतात जाऊन तो डोमकावळ्यासारखा गाऊन पांघरायचा आणि बाकीच्या डोमकावळ्यांशी शिरा ताणून भांडायचं.

अशानं मेलं ब्लडप्रेशर वाढलं तर काय घ्या.

**डॉक्टर:** तपासतो, माई, तपासतो. पण वकिल म्हणजे शेवटी दुसऱ्याचं ब्लडप्रेशर वाढवणारा माणूस. हे स्वत: आपले नामानिराळे राहणार. (दोन्ही दंडांचं ब्लडप्रेशर तपासतात.) मी काय म्हणतो माई, की कामगार संघाचा निकाल मनासारखा लागला हे ठीक झालं. पण मोटवानीची भ्रष्टाचाराची केस काही बरी चाललेली नाही. कितीही अंग घुसळलं तरी तो लेकाचा त्यात अडकणार. याचा परिणाम म्हणजे बॅरिस्टरांच्या डाव्या दंडातलं प्रेशर कमी झालेलं आहे आणि उजव्या दंडातलं वाढलेलं आहे! डाव्या आणि उजव्या! आलं की नाही लक्षात? झाला की नाही मर्मभेद?!

**बॅरिस्टर:** (माफक हसत) डॉक्टर, अहो विनोद राहू द्या. आम्ही केव्हा मरणार ते सांगून टाका एकदाचे. म्हणजे आम्ही सुटलो आणि आमचं कलत्रही सुटलं.

**डॉक्टर:** छ्या! तुम्ही कसले इतक्यात मरताय? ब्लडप्रेशर वगैरे सगळं नॉर्मल आहे. तुम्हाला काहीही झालेलं नाही आणि काळजीचं काही कारण नाही. पण एक सांगतो, तो पाईप थोडा कमी करा आणि वजनावर ताबा असू द्या. मटणबिटण बेताने खात जा.

**बॅरिस्टर:** काळजी नको. ते मी बेतानेच खातो. आता केस जिंकल्याप्रीत्यर्थ माथाडी कामगार संघवाल्यांनी काल रात्री आग्रह करकरून वाढलं तेव्हा त्यांचं मन मोडवेना. मग काय करणार? थोडंसं खाल्लं.

**डॉक्टर:** थोडंसंच खाल्लंत ना, मग हरकत नाही. शिवाय विजयानंद साजरा करायचा म्हणून थोडीशी स्कॉचपण घशाखाली उतरवून झाली असणारच. कबूल करा. झाली की नाही?

**बॅरिस्टर:** झाली ना. मी कुठे नाही म्हणतोय? आता इथेतिथे आम्ही थोडेसे देहाचे चोचले पुरवतो हे मान्य आहे. पण स्कॉच प्यायल्याचं पापक्षालन म्हणून तुमच्या माई आम्हाला कसले कसले कडू काढे पाजतच असतात.

**डॉक्टर:** त्या जे काही देतील ते डोळे झाकून पीत जा. कडू काढ्यामुळे संसाराचा गोडवा वाढत

असेल तर काय हरकत आहे म्हणतो मी?!

(रावजी पेपर बॅरिस्टरांना देतो आणि खाकरतो.)

**रावजी:** सर, तुम्ही मुंबईला गेलात तेव्हापासूनची डाक अजून साचलेली आहे. बऱ्याच संभाव्य अशिलांची पत्रं आहेत. तुम्ही म्हणाला होतात की अजून काही महिने तरी प्रो-बोनो केसेस घ्यायच्या नाहीत म्हणून.

**बॅरिस्टर:** हो, ते बरोबर आहे. ह्या कामगार संघ प्रकरणात पुष्कळ श्रम झालेले आहेत. आणि शिवाय आमच्या बबडीला खरेदीसाठी एकदा मुंबईवारी घडवून आणायची आहे. तिथे गेल्यावर पप्पाला लाडीगोडी लावून ती त्याचा खिसा कापणार हे नक्की! एकूण काय तर थोडेफार पैसे मिळवणं हे आजच्या घटकेला अत्यंत गरजेचं आहे.

**सावित्रीबाई:** (डॉक्टरांकडे बघून हसत) बघा! काय पण आव आणताहेत! (यावर डॉक्टर 'चालायचंच' असा आविर्भाव करतात.)

**रावजी:** तुम्ही सूचना दिल्या होत्यात त्याप्रमाणे पाठवणाऱ्यांची आडनावं बघून पत्रांचं वर्गीकरण केलं आहे सर. लेले, आपटे आणि करंदीकरांची पत्रं केराच्या टोपलीत टाकली आहेत. श्रॉफ, मेहरा आणि डिसूझांची तुमच्या टेबलावर ठेवली आहेत. मे आय ब्रिंग टी, सर?

**बॅरिस्टर:** हो, घेऊन ये.

**सावित्रीबाई:** आणि देवाघरची फुलं कुठे आहेत? उठलीत की नाही? मला मेलीला एवढीच ऱ्हायमिंग स्लँग येते.

**रावजी:** नंदिनीताई आणि मधुराताई उठल्या आहेत. थोड्या वेळात खाली येतील. चिरंजीव खूप रात्रीपर्यंत जागे होते. ते अजून झोपले आहेत.

**बॅरिस्टर:** यात काय आश्चर्य?

**सावित्रीबाई:** तुम्ही त्याच्यावर सारखे धार धरू नका हो.

**बॅरिस्टर:** मी कुठे काय म्हणालो? धार धरायला तो समोर तर यायला हवा ना?

(अवघडलेली शांतता. नंदिनी येते. हिच्या अंगात फुलाफुलांचं डिझाईन असलेला रेशमी गाऊन आहे.)

**सावित्रीबाई:** (त्यांची नंदिनीकडे अर्धवट पाठ आहे.) बस मधुरा. (नंदिनीकडे बघून खळखळून हसत कपाळावर हात मारून घेतात.) अगं, तू आहेस होय! गाऊनमुळे फसलेच मी. छान दिसतोय गं तुला.

**नंदिनी:** हो, मला आवडला. (बसते. गाऊन स्वत:भोवती लपेटून घेते.)

**सावित्रीबाई:** झोप लागली का छान? कामगार क्रांतीची स्वप्नं नाही ना पडली?

**नंदिनी:** हो. नाही. म्हणजे हो, झोप छान लागली. पण स्वप्नं नाही पडली.

(नंदिनी बसते.)

**सावित्रीबाई:** मधुरा आली की सगळे ब्रेकफास्टला एकत्रच जाऊ.

**नंदिनी:** हो.

**सावित्रीबाई:** इतकं रोखून काय बघतेयस?

**नंदिनी:** बंदूक! (हसते.)

**डॉक्टर:** जे कुणी अशिल फी देणार नाही त्याला धमकावण्यासाठी बॅरिस्टरांनी ती अशी ढळढळीत समोर लटकवून ठेवली आहे. काय बिशाद आहे कुणी चुकारपणा करेल?!

(बॅरिस्टर ती भिंतीवरून खाली काढून नंदिनीच्या हातात देतात.)

**बॅरिस्टर:** ही कसली बंदूक आहे माहित आहे का नंदिनी? हिला म्हणतात पॅटर्न एटीन फिफ्टी थ्री एनफील्ड रायफल-मस्केट. नळीखाली पाहिलंस तर 34BNI अशी अक्षरं कोरलेली तुला दिसतील. सहा मे अठराशे सत्तावन्न रोजी इंग्रज सरकारने जेव्हा थर्टीफोर्थ बेंगॉल नेटिव्ह इन्फन्ट्री बरखास्त केली तेव्हा या बंदुकी कुठे कुठे विखुरल्या गेल्या. लंडनला एका अँन्टीक डीलरकडे ही मला मिळाली. एका मोठ्या खटल्याची सगळी फी यात खर्ची पडली!

**नंदिनी:** नुसती हातात घेऊनच मनावर सावट येतं सर.

**बॅरिस्टर:** (हसतात) घाबरू नकोस, तिच्यात गोळी नाहीय.

(रावजी चहाचा ट्रे घेऊन येतो आणि टेबलावर ठेवतो.)

**रावजी:** इट्स अॅन एनचॅन्टिंग स्टोरी, मॅडम. याचं काडतूस म्हणजे एक कागदाचं निमूळतं आवरण असतं. दातानं त्याचं टोक फाडून काढायचं आणि आतली दारू बंदुकीच्या नळीत ओतायची. त्याच आवरणात एक शिशाची गोळी असते ती मागोमाग नळीत टाकायची आणि बंदुकीला लावलेली ही सळई आहे ती आत खुपसून गोळी घट्ट बसवायची. तर काय झालं की त्या कागदाला डुकराची आणि गाईची चरबी लावलेली आहे अशी सैन्यात अफवा पसरली. गाईची चरबी म्हणून हिंदू बिथरले आणि डुकराची चरबी म्हणून मुसलमान बिथरले. त्याचमुळे सत्तावन्नचं बंड झालं. मंगल पांडे हा थर्टीफोर्थ बीएनआयचाच होता मॅडम. त्याला फाशी दिला आणि त्याची अख्खी रेजिमेंट बरखास्त करून टाकली. इट वॉज डिसऑनरेबली डिसबँडेड! सगळ्या शिपायांच्या बंदुकी काढून घेऊन त्यांना घरी हाकलून दिलं. सरांनी ही विकत घेतली तेव्हा त्याबरोबर काडतूस मात्र नव्हतं. कसं असतं ते मला एकदा पाहायचं आहे. इट इज द गन विच इग्नायटेड द ग्रेट सिपॉय म्यूटिनी.

(नंदिनी बंदूक रावजीकडे परत देते. ती रुमालाने नीट पुसून तो पुन्हा भिंतीवर लावून ठेवतो. मधुरा येते.)

**मधुरा:** सॉरी पप्पा, उशीर झाला.

**बॅरिस्टर:** Never mind, my girl ! बस, चहा घे.

(मधुराचा आणि नंदिनीचा रेशमी गाऊन खूपच एकमेकांसारखे आहेत. मधुरा नंदिनीशेजारी येऊन किंचित अवघडून बसते.)

**मधुरा:** गाऊन फार गोड दिसतोय गं तुला.

(नंदिनी लाजून हसते.)

**डॉक्टर:** तुला सांगतो नंदिनी, उशीर करणं ही मधुराची जुनीच सवय आहे. तनय झाला त्यानंतर बॅरिस्टर आणि माई दोघेही वाट बघून थकले, पण आमची मधुराणी काही येईना. सरांना काळजी वाटायला लागली की बंगल्याचं नाव 'तमसा' ऐवजी 'तसा' ठेवावं लागतं की काय! म्हणजे आजूबाजूचे म्हणणार की आमचा बंगला असा तर यांचा 'तसा'. काय?! झाला की नाही मर्मभेद?! शेवटी सहा वर्षांनी एकदाची आली आणि सगळ्यांना हुश्श झालं! तर सांगायचा मुद्दा काय की उशीरा येणं ही तिची जुनीच सवय आहे.

**मधुरा:** डॉक्टर, you are sometimes so silly! आता उशीरा तर उशीरा. आले की नाही मी शेवटी? पण तन्या कुठे आहे?

(अवघडलेली शांतता.)

**सावित्रीबाई:** अगं, त्याला भूक नाहीय म्हणाला. आपण कशाला त्याच्यासाठी खोळंबून राहायचं? आपण आपली खळगी भरून घेऊ. काल रात्री जागून मी अळवाचे लाडू केलेत, त्यातला एकेक

मिळणार आहे प्रत्येकाला.

**डॉक्टर:** मग उशीर कशाला? चलूयाच! रावजी, ब्रेकफास्टचा बेत आपला नेहमीचाच ना?

**रावजी:** हो डॉक्टर. खिचडी आणि केजरी.

**नंदिनी:** केजरी? म्हणजे काय?

**सावित्रीबाई:** अगं, तो नुसता अगोचरपणा आहे. त्याचं काय आहे तुला सांगते. आपल्याकडचे लोक खूप आधीपासून मुगाच्या डाळीची खिचडी खायचे. टोपीकर हिंदुस्तानात आले तेव्हा त्यांना आमचं सुख बघवेना. म्हणून त्यांनी खिचडीचा विचका केला. त्यात आधी हाडूक टाकलं आणि वरून उकडलेली अंडी कुस्करून टाकली. पण इतकं करून समाधान होईना म्हणून नावाचा विचका केला. आता दाईचं दूध प्यायले म्हणून काय ह्यांना खड्डयातला ख, चरकातला च आणि डग्ग्यातला ड म्हणता येणार आहे? म्हणून मग खिचडीचं झालं केजरी.

**नंदिनी:** हे हाडूक म्हणजे कसल्या प्राण्याचं असतं?!

**मधुरा:** नाही गं. आमची मम्मा ना पूर्ण घाटी आहे. हाडूक कसलं आलंय? त्यात हॅडक मासा असतो. फार मस्त लागते केजरी. तू आज खाऊन बघ. माझ्याच शेजारी बसायचंस तू.

**नंदिनी:** बरं बाई!

**बॅरिस्टर:** चला तर. (सगळे जायला निघतात.)

**रावजी:** फॉर युअर काइंड परयूजल, नंदिनी मॅडम..

(नंदिनीच्या चेहऱ्यावर प्रश्नचिन्ह उमटतं.)

**रावजी:** सर कॉलिन कॅम्पबेल सरांनी सत्तावन्नच्या बंडावर फार चांगलं पुस्तक लिहिलंय मॅडम. गेस्ट बेडरूमच्या टेबलवर मी कॉपी ठेवतो. जरूर वाचून बघा. काडतुसाला लावलेल्या चरबीचं प्रकरण चौथ्या पानावर आहे. पेज फोर.

**नंदिनी:** पेज फोर?

**रावजी:** येस मॅडम. जरूर वाचून बघा.



## अंक दुसरा

(त्याच दिवसाची दुपार. दिवाणखान्यात कोणीही नाही. ग्रॅन्डफादर क्लॉकमध्ये चारला पाच मिनिटं कमी आहेत. नंदिनी येते आणि घड्याळाकडे निरखून पाहात राहते.)

**नंदिनी:** (स्वत:शी) मस्त आहे! आपल्याला आवडलं. टिक-टॉक! टिक-टॉक! हे-वा! हे-वा! (स्वत:शीच हसते. मग घड्याळासमोरून बाजूला जाऊन दिवाणखान्यात इकडेतिकडे निरुद्देश हिंडते. बुद्धिबळाच्या मोहऱ्यांशी चाळा करते. बंदुकीला हलकेच बोट लावून पाहते. अचानक मधुरा आत येते. ती पोपटी रंगाची साडी नेसलेली आहे.)

**नंदिनी:** मधुरा! तू इथे कशी? (चूक उमगून चेहरा झाकून घेत) अगं, सॉरी! मला तसं म्हणायचं नव्हतं. तुझंच तर घर आहे.

**मधुरा:** उगीच तुझ्या मागोमाग आले! (तिच्या जवळ जाऊन तिच्या साडीला हात लावत) छान दिसतेय तुला. (ही काल रात्रीचीच साडी आहे.)

**नंदिनी:** अगं, कसलं काय? आम्हा झुंजार पत्रकार मंडळींचा हा युनिफॉर्म असतो. त्याशिवाय अन्यायाविरुद्ध लढा द्यायला स्फुरण येत नाही. पण आज तू सुद्धा कशी काय साडी नेसलीस? किती क्यूट दिसतेयस!

**मधुरा:** असंच. तू नेसतेस म्हणून. (दोघी काही वेळ एकमेकींची नजर चुकवण्याचा प्रयत्न करत नि:शब्द उभ्या राहतात. मग तंद्री मोडते.) नंदिनी, एकदा मी तुझ्याबरोबर येऊ?

**नंदिनी:** कुठे?

**मधुरा:** असंच. तुझं काम बघायला?

**नंदिनी:** अगं, त्यात काय बघायचंय?

**मधुरा:** मला एकदा बघायचंय. (थांबून) तुला सांगू का नंदिनी, मी रोजचा पेपरपण धड वाचत नाही. त्यातल्या बऱ्याच गोष्टी माझ्या डोक्यावरून जातात. ते राजकारण मला कळत नाही. बाहेरच्या जगात एवढं काही ना काहीतरी चालू असतं त्याची मला नीट माहिती नसते. आज ब्रेकफास्टला तू आणि पप्पा इतकं भरभरून बोलत होतात. लेबर लॉ, कॉन्स्टिट्यूशनल राईट्स असं काही काही. मी आपली केजरीचा तोबरा भरून तुमच्याकडे टकमक बघत बसले होते. पण नुसतं ऐकत राहायला इतकी मजा आली. तुझं खूप कौतुक वाटतं गं. इतकं करतेस तू. You have such charge. मी आपली वेड्यासारखी नुसती बॅडमिंटन खेळते आणि पप्पांचे पैसे खर्च करते. असं काय उपयोगाचं ना? म्हणून म्हणतेय. तुझं काम कसं असतं मला खरंच समजून घ्यायचं आहे. कुठेकुठे फिरतेस, काय पाहतेस, इतक्या माणसांशी बोलतेस कशी, काय लिहायचं ते कसं ठरवतेस — सगळंच. मला नेशील?

**नंदिनी:** अगं, त्यात काय?! जरूर नेईन. पण एक सांगू का, त्यातलं खूपसं काम किचकट आणि तेच तेच असतं. ग्लॅमरस असं काही नसतं त्यात..

**मधुरा:** प्लीज, तसं समजू नकोस. मी काही सारखी ग्लॅमरच्या मागे धावते असं नाही.

**नंदिनी:** तसं नाही, तू कंटाळशील म्हणून म्हटलं..

**मधुरा:** (हसून) तू बरोबर असताना कंटाळेन कशी?

(अचानक दोघी नाक वाकडं करतात आणि एकमेकींकडे बघून हसत 'बसवण्णा!' असं एकदमच म्हणतात. बिडीचा धूर पांगावा म्हणून हातवारे करतात. नंदिनी मधुराला 'पटकन लप कुठेतरी' अशा अर्थाची खूण करते. मधुरा बावचळते आणि अलमारीत शिरून दार लावून घेते. बसवण्णा बिडी ओढत आत येतो. त्याच्या उजव्या हातात तीन वेगवेगळ्या रंगाच्या गुलाबांचा गुच्छ आहे.)

**बसवण्णा:** मॅडम, हे तुमच्यासाठी रोजचं बुके आणलं आहे. माथाडी कामगार संघात आमचं जमखंडीकडचं दोस्त असतं. ते म्हणालं तुम्ही त्यांना खटला जिंकून दिलंत म्हणून. आय वांट टु थँक यू

ऑन देअर बिहाफ, मॅडम. दे आर पूअर पीपल, मॅडम. लेबर मिळतं म्हणून घरदार सोडून इथे येतं. पुण्यात फिट बसायचं म्हणजे त्यांचं अवघडच की हो. काय चार पैसे मिळेल त्यातलं एक पैशात भागवून तीनचं बायकोला मनीऑर्डर घालून सोडतं. तुम्ही बॉम्बेला जाऊन त्यांच्यासाठी स्ट्रगल केलं म्हणजे मोठं काम केलं बघा.

**नंदिनी:** थँक यू, बसवण्णा! फार छान आहेत फुलं.

**बसवण्णा:** मॅडम, रोज इस माय स्पेशल्टी. पूना जिमखाना क्लबचं फॉर सेवन स्ट्रेट इअर्स फर्स्ट प्रैझ मीच मिळवतं.

**नंदिनी:** येस, बसवण्णा. तुझी स्पेशल्टी सगळ्यांना ठाऊक आहे.

**बसवण्णा:** आमच्या गावात एक फादर होतं. आमचं फादर नव्हे हो. चर्चात राहतं ते फादर म्हटलं तर. ते बोलून सांगायचं की दि नंबर थ्री स्टॅन्ड्स फॉर परफेक्शन इन द आईज ऑफ गॉड. म्हणून तीन कलरचं रोज कंबाईन केलं: पिंक रोज, यलो रोज ॲन्ड व्हाईट रोज.

**नंदिनी:** खरंच छान दिसताहेत फुलं.

**बसवण्णा:** पुढच्या वेळी होम व्हिजिटला जातंय तेव्हा तुमच्यासाठी बेळगावचं कुंदा घेऊन येईन बघा. कसं प्रिप्रेशन करायचं ते इथे पुण्यात कुणाला पण नॉलेज नाही बघा. बट आय विल गो बॅक टु माय गार्डन नाऊ. थँक यू अगेन, मॅडम. कीप फैटिंग.

**नंदिनी:** येस, बसवण्णा.

(बसवण्णा जातो. नंदिनी हळूच अलमारीकडे जाऊ लागते, पण तेवढ्यात हाक येते.)

**तनय:** नंदिनी! नोनो! माझी लाडाची जाज्वल्य पत्रकारिणी ती! कुठे आहेस?!

(तनय आत येतो. तो आणि नंदिनी एकमेकांना आवेगाने मिठी मारून चुंबन घेतात. मधुरा अर्थात अलमारीतच अडकलेली आहे.)

**तनय:** माथाडी कामगारांचा खटला जिंकलीस याबद्दल अभिनंदन बरं का!

**नंदिनी:** थँक यू.

**तनय:** त्यासाठी खूप काम केलं होतंस गं! आणि आबांनीही अर्थात. त्याचं चीज झालं.

**नंदिनी:** हो.

**तनय:** चार वाजता भेटायचा निरोप रावजीने तुला दिला असणार ना?

**नंदिनी:** हो, म्हणून तर आले.

**तनय:** मी त्याला म्हटलं होतं की तू एकटी नसशील तर आडवळणाची भाषा वापरून निरोप दे. तसा तो हुषार आहे.

**नंदिनी:** हो.

**तनय:** बरोब्बर चारला मी इथे आलोच होतो, पण बसवण्णाचा आवाज ऐकू आला. तो लेकाचा केव्हा कटतो याची बाहेर दबा धरून वाट बघत होतो. त्याची बडबड एकदा सुरू झाली की थांबत नाही.

**नंदिनी:** हो, पण आज लवकर आटोपलंन.

**तनय:** नोनो, तू आज काही बोलत नाहीयस.

**नंदिनी:** तसं नाही रे. कसा आहेस?

**तनय:** फार बरा नाहीय गं. (हातात हात घेऊन दोघे दिवाणावर बसून राहतात.) पोटात खूप दुखतं. सकाळी डॉक्टर आले होते ते नंतर मला गुपचूप भेटून गेले. रिपोर्ट्स वाईट आहेत. लिव्हर सिर्होसिस झालेला आहे. इथून पुढे सगळी घसरणच आहे.

**नंदिनी:** (कसंबसं रडू आवरत) यातलं आईबाबांना किती सांगितलं आहेस?

**तनय:** थेट काहीच सांगितलेलं नाही. त्यांचं त्यांनी जितपत ओळखलं असेल ते असेल. डॉक्टरांनाही मी बजावून ठेवलं आहे माझ्या अपरोक्ष त्यांच्यासमोर काही बोलू नका म्हणून. तुला सांगू का नोनो, आईआबांवर मी इतका काही खूप उखडलो आहे असं नाही. पण तसा आव आणणं हेच सध्या बरं वाटतं. त्यामुळे मग कुठलाच विषय फार वाढत नाही.

**नंदिनी:** मधुराला किती सांगितलं आहेस? (अलमारीकडे चोरून पाहते.)

**तनय:** बबडीला तर काहीच माहित नाही. तिला कळलं तर खूप वाईट वाटेल. ती माझी फार काळजी करते गं. तुझ्याबद्दलही मी तिला काहीसुद्धा बोललेलो नाही. धीर होत नाही आणि काय बोलावं ते कळत नाही. माझ्या लग्नाबिग्नाचा विषय काढते अधूनमधून. माझ्यावर प्रेम करणारं कुणीतरी हवं असं तिला फार वाटतं. पण मग मी स्त्रीद्वेष्टा कसा आहे, मला कुणीच कसं नको आहे, मी कुणालाच कसा नको आहे असं सगळं शिरा ताणून बोलून टाकतो. तेच सोपं वाटतं.

**नंदिनी:** तनय, मीही माझ्याबद्दल तुला सगळं सांगितलेलं नाही.

**तनय:** हे आणि काय आता?! सांगायचं ते सांगून टाक ना प्लीज.

**नंदिनी:** आज नको रे. एकदा नीट विचार करून सांगेन.

**तनय:** असं कितीसं वाईट असणार आहे? You are my sweetheart, Nandini.

**नंदिनी:** I know.

**तनय:** तू अशी तुटक का वागतेयस? तुला माझ्याशी बोलायचं नाहीय का?

**नंदिनी:** तसं नाही. (अस्वस्थपणे उठून बसत) छे! काय वेडेपणा आहे हा. अरे, असं नाही चालायचं. ती आत आहे —

**तनय:** कोण आत आहे?

(नंदिनी अलमारी उघडते. आतून मधुरा ओक्साबोक्शी रडत बाहेर येते. नंदिनी तिला मिठीत घेते. मधुरा तिच्या छातीवर अंग घुसळते आणि क्षणभर घोटाळून अचानक दोघी एकमेकींचं चुंबन घेतात. काही सेकंद तिघेही एकमेकांकडे अवाक होऊन पाहात राहतात आणि मग तिघांनाही अतोनात हसू फुटतं. हळूहळू हे हसू विरत जातं. दोघांचा एकेक हात धरून नंदिनी त्यांना दिवाणाकडे घेऊन जाते. तिघे शेजारी-शेजारी बसतात. नंदिनी मध्ये आहे. तिच्या उजवीकडे तनय तिला बिलगून बसला आहे आणि डावीकडे मधुरा बिलगून बसली आहे. काही काळ तिघेही निःशब्द राहतात.)

**नंदिनी:** तन्या, मला काय सांगायचं होतं हे तू ओळखलं असणार. मी बायसेक्शुअल आहे.

**तनय:** हो, ते दिसतंच आहे. पण मी मात्र एक धोपटमार्गी हेटरोसेक्शुअल आहे. चालेल ना तुला?

**मधुरा:** आणि मी एक अभिजात वळणाची हाय मेन्टेनन्स लेस्बियन आहे. नंदिनीवर माझं प्रेम आहे. मला नुकतंच कळलं.

(तिघे एकमेकांकडे बघून खिदळतात.)

**नंदिनी:** त्रांगडंच आहे हे!

**तनय:** 'त्रांगडं' हा शब्द समर्पक आहे.

**मधुरा:** मला फार छान वाटतंय. पुढे केव्हातरी आपल्याला अवघड गोष्टींवर बोलावं लागेल, पण तेव्हाचं तेव्हा बघू. आज नको. आज आनंदात राहूया.

(एकमेकांत हात गुंतवून ठेवून तिघेही मग्नपणे बसून राहतात. मधुरा नंदिनीचा चष्मा काढून स्वत:च्या डोळयांना लावते आणि हातातल्या काल्पनिक नोटपॅडवर काहीतरी लिहित असल्याचा अभिनय करते.)

**मधुरा:** (चष्मा सारखा करत) मिस नंदिनी गोखले, आमच्या हजारो वाचकांच्या मनात उद्भवलेला एक प्रश्न मी तुम्हाला विचारते: ही वेगळी वाट चोखाळण्याची प्रेरणा तुम्हाला कशी मिळाली?

**नंदिनी:** हा फार चांगला प्रश्न विचारलात तुम्ही! झालं कसं ते सांगते. माझा प्रियकर तनय जातेगावकर आणि माझी प्रेयसी मधुरा जातेगावकर यांच्या दिवाणखान्यात एक बुद्धिबळाचा संच आहे. तो फार देखणा असल्यामुळे येता जाता त्याच्याकडे नजर टाकण्याचा मोह होतो. त्यातून ही प्रेरणा मला मिळाली. जीवनाच्या पटावर प्रत्येक मोहऱ्याची चाल ठरलेली असते. हत्तीने सरळच जायचं आणि उंटाने तिरकंच जायचं. हत्तीला उंटासारखं तिरकं जाता येत नाही किंवा उंटाला हत्तीसारखं सरळ जाता येत नाही. हे असं का याला उत्तर नाही. त्यांचा तो स्वभावधर्म आहे इतकंच म्हणता येईल. But I am the queen on the board of life. मी हत्तीसारखी सरळही जाऊ शकते आणि उंटासारखी तिरकीही जाऊ शकते. हीच माझी स्वत:ची खरी ओळख आहे. ती मला पटवून दिल्याबद्दल मी जातेगावकर कुटुंबाचे मनापासून आभार मानते.

(तिघे पुन्हा खिदळतात.)

**तनय:** तू माझी नंदूराणी आहेस. (तिच्या उजव्या गालाची पापी घेतो.)

**मधुरा:** तू माझा नंदूवजीर आहेस. (तिच्या डाव्या गालाची पापी घेऊन तिला परत चष्मा घालते.)

**तनय:** माझी गुणाची बाय ती. तुझ्यावरून मीठमोहरे ओवाळून टाकायला हवेत.

(रावजी दारात येऊन खाकरतो.)

**रावजी:** चहा आणू का?

**मधुरा:** रावजी, बाहेर हवा खूप छान आहे. आजचा चहा आम्ही बागेतच बसून पिऊ. तिथेच आम्हाला तीन खुर्च्या टाकून दे.

**रावजी:** येस, मिस. (तिघांना उद्देशून) बागेत वेस्ट-पॅव्हिलियनमध्ये बसायची व्यवस्था करतो. अजून एकोणीस मिनिटांनी सूर्यास्त होणार आहे. तिथून चांगला दिसेल.

**तनय:** मग चला तर.

**रावजी:** कसं जायचं ते ठाऊक आहे ना? ह्या दारातून दिवाणखान्याबाहेर पडलात की आधी सरळ जा आणि मग तिरके जा.

**मधुरा:** रावजी, आगाऊपणा करू नकोस. आमचाच बंगला आहे.

३

(मध्ये काही दिवस लोटले आहेत. स्थळ, अर्थात दिवाणखाना. बॅरिस्टर आणि डॉक्टर अबोलपणे बुद्धिबळ खेळताहेत. एका टेबलावर चहाचा ट्रे मांडलेला आहे. तनय मांडी घालून जमिनीवर बसला आहे आणि एकाग्र चित्ताने नंदिनीची वेणी घालतो आहे. सावित्रीबाई विणकाम करताहेत. डॉक्टर एक चाल करतात. त्यावर थोडा विचार करून बॅरिस्टर त्यांची चाल करतात तशी डॉक्टर लागलीच पुढची चाल करतात. बॅरिस्टरांचा चेहरा व्यग्र होतो. काही वेळाने ते किंचित हसून मान डोलावतात आणि शेकहँड करून दोघे पटापासून दूर होतात. प्रत्येकी एकेक कप चहा ओतून घेऊन खुर्च्यांवर बसतात.)

**सावित्रीबाई:** कोण जिंकलं?

**बॅरिस्टर:** डॉक्टर.

**सावित्रीबाई:** म्हणजे तुमच्यावर मात झाली?

**बॅरिस्टर:** मी हार कबूल केली.

**सावित्रीबाई:** मला कळलंसुदीक नाही ते? सारं कसं शांत शांत चाललं होतं.

**डॉक्टर:** तसं नसतं, माई. न खेळणाऱ्यांची समजूत अशी असते की ओरडा करून बघ्यांचं डोकं उठवणं हा बुद्धिबळाचा भाग आहे. 'हाणा! मारा! बंडूनाना, वाचवा तुमचा वजीर! पांडूतात्या, गेला तुमचा उंट! बंडूनाना, हा घ्या शह! पांडूतात्या, हा मी शह काढला. हा घ्या तुम्हाला प्रतिशह!' That is not how gentlemen play. एकतर अशी सततची लाकूडतोड नसते. आणि दुसरं म्हणजे मात होईपर्यंत लांबवायचं नसतं. समजा एका खेळाडूने अशी चाल केली की तिथून पुढे मात देईपर्यंत त्याला सरळ हमरस्ता आहे. तर शिष्टसंकेत असा असतो की दुसऱ्याने ते कबूल करून हार मानावी. रस्ता दोघांनाही स्वच्छ दिसला म्हणजे पुरे. त्याच्यावर चालायची गरज नसते. चेहऱ्यावर एक सुरकुती पाडून आणि सेकंदापुरती नजर भिडवून तेवढा निरोप समोरच्याला कळवायचा असतो.

**सावित्रीबाई:** मग तर मला सहज जमेल. शिकवा एकदा.

(मधुरा आतून एका चांदीच्या ट्रे वर कापूस आणि नेलपॉलिशच्या अर्धा डझन बाटल्या घेऊन येते. नंदिनीच्या पायाशी ठिय्या मारून बसते.)

**मधुरा:** नंदी, तुझा पाय दे इकडे. रंग मी निवडणार. (नंदिनीचं पाऊल हातात घेऊन एकेक नेलपॉलिशची बाटली त्वचेलगत लावून पाहते. त्यातली एक निवडून पाऊल मांडीवर घेऊन तिच्या नखांना काळजीपूर्वक पॉलिश लावू लागते.) पप्पा, तुम्हाला हे यापूर्वी माहित नसणार, पण तुमची

एक प्रो-बोनो क्लाएंट आहे: मधुरा जातेगावकर नावाची. तुमची फी तिला परवडणार नाही, पण कायदेशीर सल्ला हवा आहे. विचारू का?

**बॅरिस्टर:** बोल बेटा.

**मधुरा:** तुम्ही आणि मम्मानं लग्न केलंत आणि आम्हाला जन्माला घातलंत. मला बॅडमिंटनची रॅकेटपण घेऊन दिलीत, त्याबद्दल थँक यू सो मच! आता इश्यू काय आहे ते तुम्हाला सांगते: तन्या, नंदी आणि मी अशा आम्हा तिघांचं एकमेकांवर प्रेम आहे. ह्या घरात आम्ही एकत्र राहणार आहोत. तन्या आणि नंदी कोकशास्त्र वाचून मूल करणार आहेत. ते मूल आम्ही तिघे मिळून वाढवणार आहोत. तुमच्या पैशांनी त्याला बॅडमिंटनची रॅकेट, पतंग आणि गोष्टींचं पुस्तक घेऊन देणार आहोत. तर आता माझा प्रश्न असा की आम्हा तिघांना एकमेकांशी लग्न करता येईल का?

**बॅरिस्टर:** बेटा, तशी कायदेशीर तरतूद नाही.

**मधुरा:** म्हणजे करता येणार नाही?

**बॅरिस्टर:** नाही. तू म्हणत असशील तर यावरची सगळी कलमं मी तुला दाखवू शकेन. हिंदू कोड बिल, स्पेशल मॅरेज ॲक्ट अशा कितीतरी नावांची जंत्री म्हणता येतील. पण त्यांत काही मिळणार नाही याची मला खात्री आहे. तशी कायदेशीर तरतूद नाही. एक पुरुष आणि एक स्त्री अशा दोघांनाच एकमेकांशी लग्न करता येतं. त्यापलिकडे नाही.

**मधुरा:** का नाही?

**डॉक्टर:** बॅरिस्टर, मर्मभेद झालेला आहे! सुकन्येचा प्रश्न बरोबर आहे: तशी कायदेशीर तरतूद का नाही? By golly, the occasion is just right! तुम्हाला सांगतो बॅरिस्टर, इतकी वर्षं तुमची न् माझी ओळख आहे पण एक गोष्ट मला कधीही नीट कळलेली नाही. मुळात कायदा म्हणजे काय हेच आम्हाला समजावून सांगा. त्यानंतर मग कायदेशीर तरतूद म्हणजे काय ते सांगा. रक्ताभिसरण कसं होतं हे मी तुम्हाला समजावून सांगितलं की नाही? Now you have to pay me in kind.

(बॅरिस्टर लगेच काही बोलत नाहीत.)

**बॅरिस्टर:** कायदा म्हणजे काय ते मला माहित नाही.

**सावित्रीबाई:** माहित नाही?! बाई गं! आता काय म्हणावं याला?! स्वत:ला कायदेपंडित म्हणवून घेऊन खोऱ्याने पैसे ओढलेत! त्यातून आमच्या डोक्यावर छत आलं, पोरीला बॅडमिंटनची रॅकेट आली, मला अळवाच्या लाडवांचं साहित्य विकत घेता आलं. पण कायदा म्हणजे काय ते माहित नाही! कुठे फेडाल हो हे पाप?! देवा, कशा माणसाशी जन्मगाठ बांधलीस रे?!

(बॅरिस्टर लगेच काही बोलत नाहीत.)

**बॅरिस्टर:** पण मला खरंच माहित नाही. मी लंडनमध्ये शिकायला होतो तेव्हा 'कायदा म्हणजे काय' यावर उलटसुलट चर्चा करत आम्ही लॉ स्टूडंट्स रात्रीच्या रात्री जागवायचो. खूप समरस होऊन बोलायचो. पण चर्चा करून एकदाच कायमचा सुटेल असा हा प्रश्न नव्हे. समजा तुम्ही लाडवासाठी गूळ खरेदी करायला मंडईत गेलात. तर त्या गुळात भेसळ असू नये असा कायदा आहे. जर कुणी भेसळ केली तर त्याला दंड होतो. हा कायद्याचा एक अर्थ झाला. पण आता दुसरं असं पाहा की डेक्कन जिमखान्यावर जमीन घेऊन आपण आपला बंगला बांधलेला आहे. त्यात आपल्या मालमत्तेची हद्द कुठे संपते आणि 'श्रमसाफल्य'ची कुठे सुरू होते याचा एक सर्व्हे असतो. घड्या घालून तुकडे पडायला आलेला हा एक जुनाट कागद असतो. तर आता हा सर्व्हे कुणी करायचा आणि झाल्यावर त्याची नोंद कुठल्या कचेरीत करायची यामागे लॅंड सर्व्हे ॲक्टचं पाठबळ आहे. कायद्याचा हा थोडा वेगळा अर्थ झाला, कारण यात दंडाचा किंवा शिक्षेचा थेट संबंध नाही. आता तिसरं असं पाहा की वयात आलेला हिंदू मुलगा वयात आलेल्या हिंदू मुलीशी लग्न करू शकतो, पण एका वेळी दोन मुलींशी लग्न करू शकत नाही. कायद्याचा हा आणखीनच भानगडीचा अर्थ झाला, कारण भेसळ म्हणजे काय हे ठरवण्यापेक्षा हिंदू कोण हे ठरवणं जास्त अवघड आहे. असे बरेच अर्थ होतात. ते सगळे आपण समोर मांडून ठेवले आणि त्यांच्यातलं समान सूत्र शोधायचा प्रयत्न केला तर फार गोंधळ होतो. म्हणून आमचे प्रोफेसर आम्हाला सांगायचे की 'कायदा म्हणजे काय' याचा फार विचार करू नका. कायद्यातल्या ठराविक मुद्द्यांचा विचार करा. बहुतेक वेळा तेवढ्याने भागतं.

**तनय:** ठीक आहे आबा, तुम्ही म्हणता ते बरोबर वाटतं. मग आता ठराविक मुद्द्याचाच विचार करूया. तुम्ही म्हणता की तीन माणसांना एकमेकांशी लग्न करता येईल अशी कायदेशीर तरतूद नाही. मान्य. पण माझा प्रश्न त्याच्या आधीचा आहे. एकच बाप्या आणि एकच बाई यांना एकमेकांशी लग्न करता येईल अशी कायदेशीर तरतूद का आहे?

**बॅरिस्टर:** का आहे म्हणजे?

**तनय:** मला एक गोष्ट कळत नाही. समजा आपल्या शेजारी 'श्रमसाफल्य' मध्ये राहणारी कुणीतरी ज्योती नाडकर्णी आणि सदाशिव पेठेत राहणारा कुणीतरी अशोक कुलकर्णी अशा दोघांना एकमेकांशी लग्न करायचं आहे. तर मी म्हणेन त्यांच्या कलाने त्यांना करू द्यावं. आता ते लग्न अंतरपाट धरून करायचं की रानफुलांच्या माळा घालून करायचं, भटजी बोलवायचा की समाजसुधारक बोलवायचा, पंक्तीला मठ्ठा असणार की नाही, लग्नानंतर कुठे राहायचं, संसार कुणाच्या पैशाने चालवायचा हे त्यांचं ते ठरवतील. मला हे कळत नाही की ह्या सगळ्याशी सरकारचा काय संबंध आहे? लग्नाबद्दल काहीतरी कायदा असला पाहिजे असा अट्टाहास सरकार का करतं? ज्योती नाडकर्णीने समजा भोंडला घातला तर सरकारला त्याच्याशी देणंघेणं नसतं. सरकारी कचेरीत जाऊन तो काही ती रजिस्टर करत नाही किंवा तिला करता येणार पण नाही. मग लग्न वेगळं का आहे?

**डॉक्टर:** एक कारण असं आहे की त्यांच्या शरीरसंबंधांना लग्नामुळे समाजमान्यता मिळते.

**तनय:** डॉक्टर, हे काही उत्तर नव्हे. एकतर समाजाची मान्यता आणि कायद्याची मान्यता या वेगळ्या गोष्टी आहेत. उदाहरणार्थ, वि. स. खांडेकर वाईट लिहितात हे सगळ्या समाजाला मान्य आहे. पण म्हणून असेंब्लीने तशा अर्थाचा ठराव पास करून घ्यायची काही गरज नसते. समाजमान्य असलेली गोष्ट कायद्याने मान्य केली पाहिजे असं काही नसतं. आणि मुळात अशा मान्यतेची गरज काय आहे? एकमेकांशी शरीरसंबंध ठेवायचे की नाही आणि ठेवायचे तर कसे ठेवायचे हे ज्योती आणि अशोक त्यांचं ते बघून घेतील. सरकारचं इथे काय काम आहे? कुणी असं का नाही म्हणत की खिरापतीला समाजमान्यता मिळावी म्हणून भोंडला रजिस्टर केला पाहिजे?

**डॉक्टर:** ठीक आहे, पण समज तुझ्या ज्योतीने आढेवेढे घेत अशोकशी शरीरसंबंध केला. आता त्यातून जर त्यांना मूल झालं तर पुढे काय?

**तनय:** तर पुढे काय? झालं तर होऊ दे. कायदा त्यांना बजावून सांगेल की त्या मुलाला खाऊपिऊ घालण्याची आणि गोष्टींचं पुस्तक घेऊन देण्याची जबाबदारी तुमच्यावर आहे. ती टाळलीत तर तुम्हाला शिक्षा करू. त्या मुलाच्या आईबापाचं लग्न झालं होतं की नाही याच्याशी ह्या सगळ्याचा काही संबंध नाही. ते झालं काय आणि नाही झालं काय, जबाबदारी तीच आहे.

**सावित्रीबाई:** म्हणजे तुला म्हणायचंय की लग्नाबद्दल काहीच कायदा करायला नको? लोकांना हवं ते करू द्यावं?

**तनय:** हो! माझं मत नंतर चुकीचं वाटलं तर ते मी मागे घ्यायला तयार आहे. पण तूर्तास तरी म्हणतो की काहीच कायदा नको.

(थोडा वेळ घेऊन) आई, तुला एक उदाहरण पटतं का बघ. लग्न बाजूला ठेव. 'मैत्री' या संकल्पनेबद्दल आपण बोलूया. तसं पाहिलं तर हा फार ढगाळ विषय आहे. बऱ्याच गोष्टींचा नीट उलगडा होत नाही. म्हणजे समज विकास आणि विलास एकमेकांना ओळखतात. तर आता प्रश्न असा आहे की हे दोघे एकमेकांचे मित्र आहेत की नाहीत? नक्की काय असलं म्हणजे ते मित्र आहेत असं म्हणता येईल? म्हणजे बुवा आपण मित्र आहोत हे त्यांनी एकमेकांना स्पष्टपणे किंवा अस्पष्टपणे बोलून दाखवणं गरजेचं आहे का? तर याला निश्चित उत्तर नाही. समज विकास विलासला मित्र समजतो पण विलास विकासला मित्र समजत नाही. तर हे दोघे एकमेकांचे कितपत मित्र आहेत? याला निश्चित उत्तर नाही. ते एकमेकांना मित्र समजत असतील तरीदेखील मदन नावाचा तिसरा एखादा माणूस म्हणू शकतो का की त्यांची मैत्री खोटी आहे किंवा हा मैत्रीचा आभास आहे? समज तो तसं म्हणाला तर विकासविलास बरोबर की मदन बरोबर हे कसं ठरवायचं? याला निश्चित उत्तर नाही. हे सगळं तारतम्यावर अवलंबून आहे. पण निश्चित उत्तरं नाहीत म्हणून काही कुणी मैत्री करायचं किंवा तोडायचं थांबत नाही. चुकतमाकत का होईना लोक करायचं ते करतातच. 'मैत्री' ह्या संकल्पनेची प्रत्येकाची जाण थोडी वेगवेगळी असते, पण सगळेजण हे समजून सांभाळून घेतात.

मग लग्नाचं तसंच का नको? ज्योती आणि अशोकचं लग्न झालेलं असणं म्हणजे काय हा त्या दोघांचा, त्यांच्या नातलगांचा आणि शेजाऱ्यापाजाऱ्यांचा प्रश्न आहे. यात जी काही मतमतांतरं असतील ती हे लोक आपापल्या बुद्धीने सांभाळून घेतील. सरकारची यात लुडबूड कशाला?

**नंदिनी:** तन्या, तुझं पटत नाही असं नाही, पण मला काय वाटतं ते सांगते. तुला म्हणायचं असं की ज्योती आणि अशोकला लग्न करायचं असेल तर ते करू द्यावं. अर्धवट झोपेत गोपाळ मुहूर्तावर करायचं असेल तर तसं करू द्यावं. काडीमोड घ्यावीशी वाटली तर आपली काडीमोड झाली असं मावळत्या सूर्याच्या साक्षीने एकमेकांना सांगून ती घेऊ द्यावी. एकत्र सामानसुमान घेतलं असेल तर ते कसं वाटून घ्यायचं हे त्यांचं त्यांनी बघावं. ज्योतीला मध्येच तिसऱ्या कुणाशी लग्न करावंसं वाटलं तर तो त्या तिघांचा अंतर्गत प्रश्न आहे. सरकारचा आणि कायद्याचा यात काही कुठे संबंध नाही. बरोबर?

**तनय:** बरोबर.

**नंदिनी:** एक पटतं का पाहा. तन्या, समज तू एक कादंबरी वाचतोयस. तुला कंटाळा आला, शेवटच्या पानापर्यंत वाचण्यात अर्थ नाही असं वाटलं तर ती तू सोडून देशील. बरोबर?

**तनय:** बरोबर.

**नंदिनी:** आता समज तू थिएटरमध्ये जाऊन एक नाटक बघतोयस. तुला कंटाळा आला, शेवटच्या अंकाचा पडदा पडेपर्यंत बघण्यात अर्थ नाही असं वाटलं तर ते तू सोडून देशील. बरोबर?

**तनय:** बरोबर.

**नंदिनी:** पण या दोन्हींत फरक आहे. तू कादंबरी सोडून दिलीस ह्याची कुणाला फिकीर नसते.  पण नाटक सोडून देताना दोन गोष्टी होतात: एक तर थिएटरच्या बाहेर जाताना इतरांचे गुडघे खात जावं लागतं. आणि दुसरं म्हणजे तू नाटक सोडून चाललायस हे इतर लोक टक लावून बघतात.

चाललेलं नाटक सोडून जाणं हा अशिष्टपणा आहे असं त्यातल्या काहींना वाटतं आणि असं वाटणारे लोक तिथे असणार आहेत हे तुला आधीपासूनच ठाऊक असतं. यामुळे फरक पडतो. हा सगळा अप्रियपणा टाळण्यासाठी तू कंटाळवाणं नाटकसुद्धा पंधरा मिनिटं जास्त बघशील. आणि त्या पंधरा मिनिटांत कदाचित तुला ते आवडायला लागेल.

**तनय:** शक्य आहे.

**नंदिनी:** लग्नाचं असंच असणार. अगदी परस्परसंमतीने जरी घेतला तरी कायदेशीर घटस्फोट हा त्रास असतो. मावळत्या सूर्याकडे नुसतं तोंड करून तो होत नाही. तेव्हा ज्योती आणि अशोकचं लग्न समज डुगडुगायला लागलं तर घटस्फोटाचा त्रास वाचावा म्हणून दोघे मिळून ते सावरायचा थोडा जास्त प्रयत्न करतील. हा त्रास पुरता काढून टाकला तर अगदीच बेतासबात प्रयत्न करतील. तेव्हा सरकारी लुडबूड ही काही सदासर्वकाळ वाईट गोष्ट नव्हे.

**तनय:** (मान डोलावतो.) मान्य. तू म्हणतेयस त्यात तथ्य आहे. पण याला आणखी एक बाजू आहे. मी असं म्हणेन की मैत्रीभोवताली कायदे असे काही नसल्यामुळे ती संकल्पना जास्त श्रीमंत होत जाते. मैत्री करणं म्हणजे काय किंवा मैत्री तोडणं म्हणजे काय ह्याबद्दल प्रत्येकाला स्वत:चा विचार करावा लागतो. लग्नाबाबतीत होतं काय की सगळ्यांसाठी एकाच मापाची चड्डी मायबाप सरकारने विकायला काढल्यामुळे लोक ती घालून घेतात, आणि आपापलं ढुंगण नीट मोजून घेऊन त्याप्रमाणे व्यवस्थित बेतलेली चड्डी कशी शिवता येईल याचा विचार करेनासे होतात. पण ते आता राहू दे. आपण म्हणालो म्हणून काही सरकार इतक्यात दुकान बंद करणार नाही. नोनो, तुझा स्वत:चा कल काय आहे? तुला लग्न करावंसं वाटतं की नाही? किंवा कसं?

**नंदिनी:** (म्हटलं तर हो, म्हटलं तर नाही असा आविर्भाव करते.) नुसत्या आपल्या दोघांना करता येईलच. पण मला तसं करायचं नाहीय. मधुराच्या मनात खूप आहे. तेव्हा करायचं तर तिला घेऊन करायचं, नाहीतर नाही.

हवी गं हवी, मला माझी मधुरा
तिच्याविना वाटे, संसार अधुरा

बघा डॉक्टर, तन्याच्या संसर्गानं मी यमक जुळवायला शिकले आणि तुमच्या संसर्गानं वाईट कोट्या करायला शिकले!

**मधुरा:** उगी, उगी! (नंदिनीच्या पावलावर प्रेमाने थापटते.)

**तनय:** (नंदिनीला उद्देशून) Thank you for the compliment, love.

**नंदिनी:**

You are welcome, mister
My beloved poetaster!

**मधुरा:** फार सुंदर काव्यपंक्ती आहेत! (टाळ्या वाजवल्याचा अभिनय करते.) नंदी, तू इथेच बसून राहा. नाहीतर नेलपॉलिश फिसकटशील. (तिला दिवाणावर बसवून पायांखाली एक उशी ठेवून तिच्यासाठी चहा घेऊन येते.) पप्पा, मला तुमचे हे जडजंबाल विषय कळत नाहीत. तन्या म्हणतो की लग्नाचे कायदे ही आपल्या खाजगी आयुष्यात सरकारची लुडबूड आहे. असेल. पण मला सरकारची लुडबूड हवी आहे. इतरांच्या आयुष्यात सरकार लुडबूड करतं तर माझ्या आयुष्यात का नये करू त्यानं? इतरांना हवं तेच मला हवं आहे. आता माझं थोडं वेगळं आहे. मला पुरुषाचं आकर्षण वाटत नाही, पण बाईचं वाटतं. नंदीचं तिसरंच काहीतरी असतं. तिला पुरुषाचं वाटतं आणि बाईचंही वाटतं. कसं काय जमतं तिला कळत नाही. पण आता इतके किरकोळ फरक तुमच्या सरकारला सांभाळून का घेता येत नाहीत? तेव्हा पप्पा, तुम्ही आमचं वकिलपत्र घ्या. सरकारात दाद मागा आणि आम्हा तिघांना लग्न करता येईल अशी कायदेशीर तरतूद करून आणा.

**नंदिनी:** तसं शक्य आहे, आबा? (जीभ चावते.) सॉरी, तन्याच्या संसर्गानं तेच तोंडात आलं!

**बॅरिस्टर:** You too, Nandini?! Then die Barrister!

**नंदिनी:** सॉरी सर, पण सांगा ना!

**बॅरिस्टर:** बबडे, त्याआधी तू मला एक सांग. तुला नंदिनीशी लग्न करायचं आहे की दोघांशी?

**मधुरा:** दोघांशी. मला आणि तन्याला काही शरीरसंबंध करायचा नाहीय. पण त्याचा, माझा आणि नंदीचा संसार एकच असणार आहे. म्हणून मला त्या दोघांशी लग्न करायचं आहे.

**बॅरिस्टर:** मला अवघड वाटतं. पण बबडीने कायदेशीर सल्ला मागितला आहे तर तो रीतसर द्यायला हवा. (स्वत:साठी आणखी एक कपभर चहा ओतून घेतात. तुम्हालाही हवा असेल तर पुष्कळ आहे, असा आविर्भाव करतात. तनय नंदिनीचा कप पुन्हा भरतो.)

**नंदिनी:** अशी एका जागी खिळून बसून चहा पीत राहिले तर शू लागेल.

**सावित्रीबाई:** अगं, तेवढाच सराव होईल. चहा ढोसत राहिल्याशिवाय का कुठे पत्रकार होता येतं? आणि बाईच्या जातीला शू दाबून ठेवायची सवय हवीच.

**बॅरिस्टर:** झालं तुमचं?!

**सावित्रीबाई:** हो.

**बॅरिस्टर:** ठीक. तर आपल्यासमोरचा प्रश्न असा आहे की तीन सज्ञान व्यक्तींना एकमेकांशी लग्न करता येईल अशी कायदेशीर तरतूद सध्या नाही, तर ती कशी करून घ्यायची. यात दोन अडचणी आहेत: एकतर बबडी लेस्बियन आहे आणि स्वत: स्त्री असून तिला दुसऱ्या स्त्रीशी लग्न करायचं आहे. सध्या हे कायद्याने शक्य नाही. दुसरं म्हणजे नंदिनी बायसेक्शुअल आहे आणि तिला एका पुरुषाशी आणि एका स्त्रीशी एकाच वेळी लग्न करायचं आहे. हेही सध्या शक्य नाही. तर मग काय करायचं?

अशी कायदेशीर तरतूद अर्थात पार्लमेंट करू शकतं. तेव्हा ती करा बाबांनो, अशी पार्लमेंटमध्ये बसलेल्या लोकांना — म्हणजेच खासदारांना — गळ घालणं हा एक मार्ग आहे. पण 'खासदार' ह्या जमातीतले शंभरांपैकी पंचाण्णव लोक बेअक्कल असतात. त्यांच्या नादी लागण्यात अर्थ नसतो,

तेव्हा तो विचार नको.

दुसरा मार्ग म्हणजे कोर्टात फिर्याद करणं. तिथे बेंचवर बसलेले लोक जास्त शहाणेसुरते असतात. हेकट माणसं तिथेही आहेतच, पण तीच फक्त भरलेली नाहीयत. त्यामुळे हा मार्ग जास्त बरा वाटतो. तर फिर्याद अशी करायची की अमुक प्रकारची कायदेशीर तरतूद नसणं हा माझ्या अशिलावर अन्याय आहे. न्याय देणं याच कामासाठी कोर्ट बसवलेलं असल्यामुळे अन्याय झाला असं म्हटलं की त्याला दखल घ्यावी लागते. पण अन्याय झाला असं नुसतं म्हणून चालत नाही, तर ते म्हणायचा एक ठराविक साचा असतो. आपल्या देशाच्या घटनेत काही वेचीव शब्दप्रयोग आहेत: आपण सगळे कायद्यासमोर समान आहोत असं त्यात म्हटलेलं आहे. किंवा आपल्या सर्वांना सन्मानाने जगता येईल अशी हमी दिलेली आहे. नक्की शब्दप्रयोग महत्त्वाचे नाहीत आणि घटनेत ते कुठे येतात हेही महत्त्वाचं नाही. प्रीअँबल बघा किंवा पार्ट थ्री आर्टिकल फिफ्टीन बघा असं लोक एकमेकांना सांगतात, पण प्रत्यक्षात तिथे बघून काही जास्त कळतं असं नाही. तर मी साचा म्हणालो तो असा की सध्याचा कायदा ज्या भाषेत लिहिलेला आहे त्यामुळे अमुक पानावर नमूद केलेल्या माझ्या तमुक घटनात्मक हक्काचा भंग होतो असं कोर्टाला म्हणायचं. आता हे जर रिवाजाला धरून म्हणायचं तर कुरूप आणि क्लिष्ट इंग्रजीत शे-दोनशे पानं खरडावी लागतात. जुन्या केसेस शोधून काढून त्या त्या जजमेंटातले उतारे द्यावे लागतात. पण तो सगळा कंटाळवाणा कारकुनी भाग झाला. बेंचवर बसलेले लोक इतके शहाणेसुरते असतात की ही दोनशे पानं ते वाचत नाहीत.

**नंदिनी:** You sound cynical, Sir.

**बॅरिस्टर:** Do I? Well, I am being pragmatic, that's all. तुपकट चेहरा करून ब्रह्मानंदी टाळी लागल्याच्या आविर्भावात घटनेबद्दल भरभरून बोलण्याचा आपल्याकडे प्रघात आहे. तो मी पाळत नाही.

**नंदिनी:** (हसू दाबत) All right. Do go on, Sir.

**बॅरिस्टर:** तर आपल्या घटनेत असं म्हटलेलं आहे की अशोक कुलकर्णी आणि बबडी जातेगावकर

कायद्यासमोर समान आहेत. मुख्य म्हणजे ते भिन्नलिंगी आहेत म्हणून त्यांना वेगळं वागवता येत नाही. अशोक पुल्लिंगी आहे म्हणून त्याने कमी टॅक्स द्यायचा आणि बबडी स्त्रीलिंगी आहे म्हणून तिने जास्त द्यायचा असं सरकारला करता येत नाही. तसं केलं तर समानता ह्या तत्त्वाचा भंग होईल. पण मेख अशी की काही बाबतींत त्यांना वेगळं वागवलेलं कायद्याला चालतं. अशोकला सैन्यात शिरून लढाईवर जाता येतं तसं बबडीला जाता येत नाही. तिला सैन्यात डॉक्टर होता येतं, पण सीमेवर जाऊन लांड्यांना थेट गोळ्या मारता येत नाहीत. हे असं का याला सरकार बरीच कारणं देतं. सरकार म्हणतं की बबडीला एकतर इतकी जड बंदूक उचलणार नाही. शिवाय सीमेवर तंबू ठोकून राहात असताना अशोकला उघड्यावर कुठेतरी आंघोळबिंघोळ करावी लागते तेव्हा बबडी तिथे आसपास नसलेलीच बरी. म्हणजे एकूण सरकार असं म्हणतं की प्राणाची बाजी लावून देशाचं संरक्षण करण्याची परवानगी आम्ही बबडीला देत नाही, पण यामुळे समानता ह्या तत्त्वाचा भंग होतो असं काही म्हणता येणार नाही.

आता होतं काय की 'समानता' हा शब्द फार अमूर्त आहे, आणि सामान्य लोकांच्याच नव्हे तर न्यायाधीशांच्याही मनात त्याला स्पष्ट अर्थ असा नसतो. त्यामुळे सरकारचं बरोबर की चूक हे ठरवणं अवघड जातं. यावर उपाय म्हणजे जो काही विशिष्ट मुद्दा विचाराधीन असेल त्यावरची तुमची भावनिक किंवा नैतिक प्रतिक्रिया वापरणं. बबडी स्त्री आहे म्हणून तिला टॅक्स जास्त लावला तर 'अरेच्चा, हे बरोबर नाही बरं का' अशी प्रतिक्रिया मनात पटकन उमटते. 'समानतेच्या तत्त्वाचा भंग झाला' हे त्या प्रतिक्रियेचं कपडे घातलेलं रूप आहे. कोर्टात युक्तिवाद करताना लोक तत्त्वाची भाषा वापरतात, कारण पद्धत तशी आहे. पण खरं काम त्यामागची प्रतिक्रियाच करत असते. याउलट बबडीला लढाईवर न्यायला सरकार नाही म्हणालं तर अशी काही प्रतिक्रिया बहुतेक लोकांच्या मनात उमटत नाही. उलट लोकांना बबडीबद्दल काळजी वाटते आणि 'कशाला बाई तिथे जातेस' असंच ते मनातल्या मनात म्हणतात. त्यामुळे मग समानतेचं तत्त्व आपोआपच बाजूला पडतं. लढाईवर जायची बबडीला स्वत:ला खूप उबळ असली तरी इतरांवर तिचा म्हणावा तसा परिणाम होत नाही.

आपला प्रश्न हाच आहे. अशोक कुलकर्णीला एका स्त्रीशी लग्न करता येतं तर मग बबडी जातेगावकरला का नाही? यामुळे समानतेच्या तत्त्वाचा भंग का होत नाही? आणि इथेही अडचण तीच आहे. एका बाईला दुसऱ्या बाईबरोबर संभोग करावासा वाटू शकतो किंवा संसार थाटावासा

वाटू शकतो हे बहुतेक लोकांच्या मनाआड असतं. त्यांना ते आतून कळत नाही. आणि त्यामुळे बबडीची तक्रार ऐकूनही कुणाला त्याबद्दल फारशी सहानुभूती वाटत नाही. आता जर तुम्ही इथे समानतेचा आग्रह धरलात तर त्यामागे सहानुभूतीचं पाठबळ नसल्यामुळे होतं काय की एकतर लोकांना तो दुराग्रह वाटतो किंवा एकूणच त्या प्रश्नात दात कुठून रोवावेत ते कळत नाही.

**नंदिनी:** पण म्हणजे सर, 'समानता' किंवा 'सन्मान' हे शब्द इतक्या व्यासंगी चश्मिष्ट लोकांनी घटनेत आवर्जून लिहून ठेवले आहेत, त्यांना स्वत:चा असा अर्थ काही नाही?

**बॅरिस्टर:** (अनिश्चितपणे मान हलवतात.) मला तसं म्हणायचं नाही. निदान उघडपणे म्हणायचं नाही. पण नंदिनी, असं बघ की शब्द आणि त्यांचे अर्थ यावर सेमिनार भरवून काही निष्पन्न होत नाही. समानता म्हणजे काय किंवा सन्मान म्हणजे काय यावर काथ्याकूट करण्याऐवजी कायद्याच्या विशिष्ट मुद्द्यात समानतेचा संबंध कसा येतो इतकंच पाहणं सोयीचं पडतं. आपलं आर्ग्युमेंट समोरच्याला पटवून द्यायचं असेल तर उपयोग त्याचा होतो. जज्जच्या डोक्यातली अमूर्त कल्पना आणि तुमच्या डोक्यातली अमूर्त कल्पना ह्या दोघी एकमेकींत बसवायला गेलात तर ते बापजन्मी शक्य होत नाही. माथाडी कामगारांना सन्मानाने जगण्याचा हक्क आहे हा मुद्दा आपण मुंबईला हायकोर्टासमोर मांडला. त्याला बळकटी यावी म्हणून इंग्लंडमधल्या औद्योगिक क्रांतीपर्यंत मागे जाऊन ऐतिहासिक दाखले दिले. मँचेस्टर गार्डियनचे पिवळे पडलेले अंक तपासले. ह्या विषयावर हाउस ऑफ लॉर्ड्समध्ये किती साली कोण काय म्हणालं होतं ते भिंग लावून हॅन्सर्डमध्ये बघून आपल्याला हवा तो त्यातला भाग वापरून घेतला. ह्या सगळ्याचा उपयोग झाला आणि आपण केस जिंकलो. पण सन्मानाने जगणं म्हणजे काय किंवा त्यात कशाचा अंतर्भाव होतो आणि कशाचा होत नाही हे मोघम विचारलंस तर मला तसं सांगता येणार नाही.

**नंदिनी:** मान्य आहे, सर. पण मग माझ्या किंवा मधुराच्या बाबतीत असं आर्ग्युमेंट यशस्वी होईल असं तुम्हाला वाटत नाही?

**बॅरिस्टर:** नाही. मी म्हणालो की बेंचवर बसलेली माणसं जास्त शहाणीसुरती असतात. पण त्यांच्या जजमेंटमध्येही भावनिक प्रतिक्रियेचा वाटा असतोच. तसं ते कबूल करणार नाहीत, पण म्हणून तो नाहीसा होत नाही. आणि ही प्रतिक्रिया कुणाची काय असेल ते सद्यपरिस्थितीत सांगवत नाही. पण

जरी ती आपल्याला धार्जिणी असली तरीसुद्धा ज्या वाटेने त्यांना आपण जायला सांगतो आहोत ती इतकी बिकट आहे की ही शहाणी माणसंही कचरतीलच. मग अशा वेळी प्रश्न टाळण्याचा एक हुकमी आणि ठरीव मार्ग कोर्टासमोर असतो. अमुकतमुक निर्णय हा न्यायालयाच्या कक्षेत येत नाही तर तो पार्लमेंटने घ्यावा असा एक संकल्प म्हणता येतो. प्रत्यक्षात काय असतं की पार्लमेंटमध्ये बसणाऱ्या मंडळींच्या सुज्ञपणाबद्दल बेंचवर बसणाऱ्यांचं मत फारसं चांगलं नसतं. असा निर्णय घेण्यासाठी जो विचारीपणा लागतो तो पार्लमेंटकडे आहे असं त्यांना मनातून वाटत नसतंच. पण तसं कुणी बोलून दाखवत नाही. म्हणजे आपापसांत व्हिस्की पिताना ठीक आहे, पण चारचौघांत नाही.

**नंदिनी:** मग आम्ही काय करायचं सर? ही भावनिक प्रतिक्रिया म्हणा किंवा सहानुभूती म्हणा, आमच्या बाजूला वळावी म्हणून आम्ही काय करायचं? वर्तमानपत्रातून लेख लिहून आम्ही आहोत, आमच्याकडे लक्ष द्या, असं सांगायचं? मोर्चे काढायचे?

**बॅरिस्टर:** हो. अगदी आत्ताच नको. पायाची नखं वाळू देत. पण त्यानंतर हो.

**नंदिनी:** पण असं असेल तर मला तन्याचं म्हणणं जास्त जास्त पटायला लागलं आहे. तुम्ही म्हणता तसे दोन वेगळे मुद्दे यांत गुंतलेले आहेत. मधुरा लेस्बियन आहे म्हणून तिला एका बाईशी लग्न करायचं आहे. आता लेस्बियन बाया एकतर दुर्मीळ आहेत आणि शिवाय चारचौघींसारख्याच दिसतात. बॅडमिंटन खेळताना मधुरा काही वेगळी ओळखू येत नाही. पण त्यामुळे कायद्याने त्यांना एकमेकींशी लग्न करता येत नाही ही अडचण कुणी मनावर घेत नाही. मग त्यांनी काय करायचं? तुम्ही म्हणता की मोर्चे काढायचे, लेख लिहायचे, बेअक्कल खासदारांची मनधरणी करायची, डेक्कन क्वीनने मुंबईला जाऊन जज्ज नरीमनसमोर पदर पसरायचा. कित्येक वर्षं उन्हाळ्यामागून पावसाळ्यामागून हिवाळे हे सतत करत राहिल्यानंतर केव्हा तरी ही कायदेशीर तरतूद होईल. जेव्हा होईल तेव्हा त्या पेढे वाटतील. ठीक आहे.

मी बायसेक्शुअल आहे, म्हणून मला एका बुवाशी आणि एका बाईशी एकाच वेळी लग्न करायचं आहे. आता बायसेक्शुअल माणसं एकतर दुर्मीळ आहेत आणि शिवाय चारचौघांसारखीच दिसतात. लेडीज हॉस्टेलात मी काही वेगळी ओळखू येत नाही. पण त्यामुळे कायद्याने आम्हाला एकाच वेळी

दोन माणसांशी लग्न करता येत नाही ही अडचण कुणी मनावर घेत नाही. मग आम्ही काय करायचं? तुम्ही म्हणता की मोर्चे काढायचे, लेख लिहायचे, बेअक्कल खासदारांची मनधरणी करायची, डेक्कन क्वीनने मुंबईला जाऊन जज्ज सोराबजीसमोर पदर पसरायचा. कित्येक वर्षं उन्हाळ्यामागून पावसाळ्यामागून हिवाळे हे सतत करत राहिल्यानंतर केव्हा तरी ही कायदेशीर तरतूद होईल. जेव्हा होईल तेव्हा आम्ही बर्फी वाटू.

पण हे ठीक नाही, सर. ह्यात अतोनात वेळ फुकट जातो आणि अतोनात शक्ती फुकट जाते. तोच तो प्रश्न आपण किती वेळा सोडवत राहणार? म्हणूनच तन्याचं म्हणणं बरोबर वाटतं, सर. तुमच्या कायद्याला आम्ही म्हणतो की बाबारे, आमच्या अंथरुणातून तुझी सोंड काढून घे. तुझ्या तरतुदी आम्हाला नकोत. आमचं आम्ही बघून घेऊ.

(थोडा वेळ कुणी काही बोलत नाही.)

**डॉक्टर:** आणि कोर्टकचेऱ्या करायच्या तर तितका वेळही आपल्याकडे नाही.

**तनय:** डॉक्टर —

**डॉक्टर:** तितका वेळ आपल्याकडे नाही.

**सावित्रीबाई:** हो, ते तुकड्यातुकड्यांनी माझ्या लक्षात यायला लागलं आहे. तन्या स्वत:ला खूप हुशार समजतो. पण मी काही खुळी नाही. त्याच्या पोटात दुखतं, डोळे पिवळे दिसतात हे काही त्याला नीट लपवता येत नाही.

**बॅरिस्टर:** डॉक्टर, तितका वेळ नाही म्हणजे किती आहे?

**डॉक्टर:** तसं निश्चित कधीच सांगता येत नाही. पण ही सगळी डीकॉम्पेन्सेटेड सिऱ्होसिसची लक्षणं आहेत. यातून तो कायमचा उठेल अशी शक्यता कमी आहे. दीडदोन वर्षं मिळाली तर मिळाली.

(थोडा वेळ कुणी काही बोलत नाही.)

**तनय:** आबा, आई, सज्जनहो, सगळे ऐका. मी जसा जगलो तसा जगलो; जे प्यायलो ते प्यायलो. आता जे व्हायचं ते होईल. त्याबद्दल रडत बसूया नको. माझ्याकडे जितका वेळ उरला आहे तो वापरून घेऊया. मी म्हणतो की कायदा आणि त्याची तरतूद दोघेही काशीत जावोत. आम्ही तिघे घरगुती लग्न करू. सरकारदरबारी ते रजिस्टर होणार नाही आणि आम्हाला करायचंही नाही. तुम्ही आशीर्वाद द्या, तेवढं आम्हाला पुष्कळ होईल.

**बॅरिस्टर:** ठीक आहे.

**सावित्रीबाई:** मी तयारीला लागते.

**मधुरा:** (उत्साहात येऊन) I like tradition! मी आणि नंदी शालू नेसणार आहोत. तन्याला आपण झुळझुळीत झब्बा घालूया. सगळं कसं वेदोक्त आणि पारंपारिक करायचं!

**सावित्रीबाई:** बबडे, शब्द 'पारंपरिक' असा आहे. 'परंपरा' पासून 'पारंपरिक'.

**मधुरा:** मम्मा, तू म्हणजे अशी पंतोजीण आहेस ना! पण माझी लाडकी मम्मा आहेस. म्हणून आहेस तश्शी चालवून घेते तुला.

**सावित्रीबाई:** न घेऊन सांगशील कुणाला बबडे?

**तनय:** मग ठरलं तर! बार उडवूनच टाकू. Let us make an honest woman out of you, Nandini.

**नंदिनी:** Thank you, dear. But I would rather be doubly honest.

**डॉक्टर:** बॅरिस्टर, ही तुम्हाला अडचणीत आणणार! A doubly honest woman may prove

doubly dangerous in a lawyer's house.

**बॅरिस्टर:** आता विनोद पुरेत. तयारीला लागूया.

**डॉक्टर:** पौरोहित्य मी करणार, त्यामुळे माझे विनोद तुम्हाला सहन करावे लागतील.

३

(लग्नाचा दिवस. मधुरा, नंदिनी आणि सावित्रीबाई शालूत आहेत. तनयने वेलबुट्टी काढलेला झुळझुळीत सदरा आणि धोतर असा वेष केला आहे. बॅरिस्टरांनी सूट घालून मिडल टेंपलचा नेकटाय लावला आहे. रावजीने बंद गळ्याचा कोट घातला आहे तर बसवण्णाने दक्षिणी पद्धतीचा पंचा गुंडाळला आहे. डॉक्टर सोवळ्यात आहेत. रावजी ग्रॅन्डफादर क्लॉकपाशी उभा राहतो. बसवण्णा एक वेताची टोपली घेऊन येतो आणि नंदिनीला दोन पिवळे, तनयला दोन पांढरे आणि मधुराला दोन गुलाबी रंगाचे हार काढून देतो. नाटकातली आठही पात्रं ह्या घटकेला रंगमंचावर आहेत. रावजीने वेळ झाल्याची खूण करताच डॉक्टर आपल्या हातातला इंग्रजी 'वाय' अक्षराच्या आकाराचा अंतरपाट उलगडतात. त्याचे तीन पदर डॉक्टर, रावजी आणि बसवण्णा हातात घेतात, तर तीन कोनांमध्ये तनय, मधुरा आणि नंदिनी उभे राहतात.

स्वस्ति श्री गणनायकम् गजमुखम् मोरेश्वरम् सिद्धिदम्
बल्लाळो मुरुडम् विनायकमहम् चिंतामणिम् थेऊरम्

असा उंच किनरा आवाज लावून रावजी सुरुवात करतो, तसे डॉक्टर, बसवण्णा, बॅरिस्टर आणि सावित्रीबाई त्यात सूर मिसळतात. ह्या नाटकाचा प्रयोग कुणाला करावासा वाटला तर मंगलाष्टकं म्हणण्यात प्रेक्षकांना सहभागी करून घेता येईल.

तदेव लग्नम् सुदिनम् तदेव
ताराबलम् चंद्रबलम् तदेव
विद्याबलम् दैवबलम् तदेव
लक्ष्मीपते तेंऽघ्रियुगम् स्मरामि

हा श्लोक झाल्यानंतर 'शुभमंगल सावधान' होऊन अंतरपाट दूर होतो. तिघांपैकी प्रत्येकजण आपल्या हातातले दोन हार इतरांच्या गळ्यांत घालतो, जेणेकरून तीन वेगवेगळ्या रंगसंगती तयार होतात. तिघेजण उपस्थितांच्या पाया पडून आशीर्वाद घेतात.)

**तनय:** (किंचित झोकांड्या देत बरळल्यासारख्या सुरात) डॉक्टर, हिला शपथ घ्यायला लावा! (त्याच्या आविर्भावावरून हे थट्टेत चाललं आहे हे स्पष्ट व्हावं.)

**नंदिनी:** घेईन ना पतिराज! पण मी एकटीच नाही. आपण सगळे घेऊ.

**डॉक्टर:** सगळ्यांनाच घ्यावी लागणार आहे. असे ओळीने उभे राहा. शपथ देतो तुम्हाला —

(तनय, नंदिनी आणि मधुरा ओळीने उभे राहतात.)

**डॉक्टर:** धर्मे च, अर्थे च, कामे च —

**तनय:** नातिचरामि

**नंदिनी:** नातिचरामि

**मधुरा:** नातिचरामि

**डॉक्टर:** धर्मे च, अर्थे च, कामे च —

**तनय** आणि **नंदिनी:** नातिचराव:

**नंदिनी** आणि **मधुरा:** नातिचराव:

**मधुरा** आणि **तनय:** नातिचराव:

(रावजी एका चांदीच्या प्लॅटरवर दाट किरमिजी रंगाचा फ्रूट-केक घेऊन येतो.)

**रावजी:** माय हार्टिएस्ट कॉन्ग्रॅच्युलेशन्स ऑन युअर वेडिंग, सर ॲन्ड मॅडम्स! 'मिसेस बीट-ऑन्स बुक ऑफ हाउसहोल्ड मॅनेजमेंट' मध्ये वाचून मी हा फ्रूट-केक तयार केला आहे. इट्स अ व्हेरी कलेक्टिबल बुक. बॅरिस्टरसरांनी चेरिंग क्रॉसला विकत घेतल्याची त्यांच्याच हस्ताक्षरातली नोंद आहे.

(सगळे केक खाऊन पाहतात.)

**मधुरा:** आहाहा! रावजी, केक झकास झाला आहे! पण तुला किती वेळा सांगितलं की 'मिसेस बीट्न' असं म्हणायचं. 'बीट-ऑन' नव्हे. तो काय क्रिकेटमधला फॉलो-ऑन आहे का?

**रावजी:** येस मिसेस, सॉरी मिसेस. गेल्या पंधरवड्यात त्या कर्वेमॅडम आल्या होत्या तेव्हा मी असंच म्हणालो. पण मी काय बोलतोय ते त्यांना कळलं नाही.

**मधुरा:** नाही तरी ती कर्वीण जरा मंदबुद्धीच आहे. तिला वाटतं की आपल्या पोराशी सारखं इंग्लिशमधून बोललं तर त्याला जगन्नाथ शंकरशेट मिळेल. इथे आली होती तेव्हा मला म्हणाली की आपण बुद्धिबळं खेळूयात. वजिराच्या बाजूचा किल्लेकोट कसा करतात ते माहित नाही आणि म्हणे मी बुद्धिबळं खेळते!

**रावजी:** येस, मिसेस.

**मधुरा:** रावजी, आजचा दिवस म्हणून तुला आगाऊपणा माफ करते आहे.

**रावजी:** थँक यू, मिसेस! मग मी म्हणेन की केक फार खाऊ नका, नाहीतर जेवायला भूक राहणार नाही. (उरलेला केक घेऊन तडकाफडकी आत जातो. बसवण्णा येतो.)

**बसवण्णा:** माय कॉन्ग्रॅच्युलेशन्स ऑल्सो ऑन युअर वेडिंग, सर ॲन्ड मॅम्स! बॅरिस्टरसर, पूना मंडई माथाडी कामगार संघात आमचं जमखंडीकडचं दोस्त असतं. त्यांचं निरोप आलं होतं. आज रात्री संघातर्फे ग्रॅंड वेडिंग पार्टी अरेंज केलं आहे. गुलाबजाम आणि बोकड असं डिनर-मेन्यू असतं. मी ऑस्टिन समरसेट स्वच्छ करून पेट्रोल टाकून रोज पेटल्सचं डेकोरेशन करून तयार ठेवलं आहे.

**सावित्रीबाई:** अरे मेल्या, मंडई शुक्रवारात आहे. संध्याकाळी तिथे नुस्ती सायकलींची आणि टांग्यांची तोबा गर्दी असते. एवढी मोठी गाडी नेणार कशी? वाट काढता काढता पुरेवाट होईल!

**बसवण्णा:** तसं विचार करायचं नसतं, मॅडम. आजूबाजूला सायकल आणि टांगा गर्दी करून असलं म्हणून ऑस्टिन समरसेट सोडून द्यायचं नसतं. आपण आपलं गाडी चालवायचं. गाडीला अकोमडेट कसं करायचं दॅट इज देअर प्रॉब्लेम.



## अंक तिसरा

(रात्रीची वेळ. ग्रॅन्डफादर क्लॉकमध्ये दहाचे टोले पडतात. सावित्रीबाई विणकाम करत दिवाणखान्यात एकट्याच बसल्या आहेत. वरच्या मजल्यावरून डॉक्टर येतात. शिणलेले आहेत.)

**सावित्रीबाई:** डॉक्टर! बसा.

**डॉक्टर:** बॅरिस्टर इथे नाहीत?

**सावित्रीबाई:** दिल्लीला गेले आहेत. बार काउन्सिलची मीटिंग आहे. तेरवा परत येतील.

**डॉक्टर:** नाहीत हे एका दृष्टीने बरं आहे.

**सावित्रीबाई:** हो. (थोडा वेळ थांबून) तुमचं रात्रीचं जेवण झालं नसणार —

**डॉक्टर:** नाही. तुमचा फोन आला तसा लागलीच निघालो.

**सावित्रीबाई:** मी रावजीला सांगून आले आहे. तो इथेच काहीतरी घेऊन येईल.

**डॉक्टर:** ठीक आहे.

**सावित्रीबाई:** कसं आहे आता?

**डॉक्टर:** त्याला मॉर्फीनचं मोठं इंजेक्शन देऊन आलो आहे. तेवढ्याने झोपेल. पण माई, आता हे असं वारंवार होत राहणार. पोटात दुखणं, थकवा येणं, डोक्यात गोंधळ होणं — ही सगळी एन्ड-स्टेजची लक्षणं आहेत. (सावित्रीबाई डोळ्याला पदर लावतात.) माई —

(थोडा वेळ दोघेही अबोलपणे बसून राहतात.)

**सावित्रीबाई:** तुम्हाला सांगते डॉक्टर, दारूची लत त्याला नंतर लागली. आधी अपेशाची आणि दु:खाची लत लागली. सगळं चुकतच गेलं हो —

**डॉक्टर:** च्च! तुम्ही त्रास नका करून घेऊ.

**सावित्रीबाई:** ह्यांच्या अपेक्षा होत्या. आणि ते साहजिक आहे. एकुलता मुलगा. सगळं समोर मांडून ठेवलेलं. पण प्रत्येक माणूस तेवढं हुशार नसतं ना. बिचारा घुसमटून गेला. आणि मग काय? मला तुमचा तो अभ्यास जमतच नाही, यशाची तुमची ती व्याख्याच मला मान्य नाही, मला ह्यात पडायचंच नाही असं म्हणत म्हणत तेच घट्ट होऊन गेलं.

**डॉक्टर:** हो. बॅरिस्टर देखील बोलून दाखवायचे मला.

**सावित्रीबाई:** कधी कधी वाटतं की त्याला शिकण्यात रस नाही हे आधीच ओळखून समजून घेतलं असतं तर बरं झालं असतं. मी म्हणते जाग्रणं करत काहीतरी सटरफटर वाचत बसला असता. चार सुमार कविता केल्या असत्यान. अधून मधून थोडी प्यायला असता. तेवढ्याने काही बिघडलं नसतं. असल्या फुळकावणी वाईट सवयी सांभाळायची आमची ऐपत होती. पण आम्ही उगीच त्याला ढकललं आणि शेवटी दरीत पडला.

**डॉक्टर:** हो. आता इतकी वर्षं त्याला समोरच बघतो आहे. तुम्ही म्हणता तसंच थोडंबहुत झालं. पण शेवटी असं आहे माई, की चूक कुणाची न् काय ह्यात आत्ताच्या घटकेला शिरण्यात अर्थ नाही. आणि तसं ते ठरवणं शक्यही नसतं. पोरांनाही त्यांची त्यांची इच्छाशक्ती असतेच. एका प्रमाणाबाहेर ती हवी तशी वाकवता येत नाही.

**सावित्रीबाई:** खरं आहे.

(रावजी आत येतो. त्याच्या हातातल्या ट्रे मध्ये चिनी मातीचं सूप वाढायचं निळं भांडं आहे. बरोबर चांदीचा चमचा आहे.)

**रावजी:** तूपवरणभात. बाजूला थोडीशी काल्र्याची भाजी वाढली आहे.

**डॉक्टर:** थँक यू.

**रावजी:** येस डॉक्टर. (जातो.)

**डॉक्टर:** (चवीने खात) बॅरिस्टर इथे असते तर हे बघून त्यांनी मला तुमचं घर कायमचं बंद केलं असतं! अब्रह्मण्यम्! वेजवूडच्या सूप टरीनमधून तूपवरणभात खातो म्हणते काय?!

**सावित्रीबाई:** खा हो. काय त्याचं एवढं? विलायतेतून हे परत आले तेव्हा तिथून आणलेल्या ह्या साहेबी सवयी मला रुचायच्या नाहीत. मी सतत त्यांना खिजवायला बघायची. आता आठवून लाज वाटते. एकदा मुद्दाम ह्यांच्यासमोर चांदीच्या ताटात राईस पुडिंग वाढून घेऊन त्याच्या चित्रावती घातल्या. फार चिडले होते.

**डॉक्टर:** तुम्हाला मानलं पाहिजे. इतकी वर्षं त्यांच्याबरोबर घालवून तुम्ही काही मेमसाहेब झाला नाहीत —

**सावित्रीबाई:** नाही हो, तो माझा पिंड नव्हे. झालं काय तर मला अठरावं लागलं तेव्हा बरीच स्थळं सांगून यायला लागली. मेणोलीला आमचा जमीनजुमला खूप होता. आता मुळात नानाला गंडा घालून मिळवलेले नंतर पठाणी व्याजाने देऊन फुगवले होते ते सोडा. पैसा जुना झाला की कुणी विचारत नाही कसा आला ते. ह्यांचंही घरचं बरं होतं पण आमच्याएवढं नाही. पोरगा खूप हुशार आहे, इंग्लंडला जायचं म्हणतो इतकं बघून बाबांनी स्थळ पसंत केलं. लग्न झालं. मग हेच म्हणाले की तिथे माझ्याबरोबर तू एका खोलीत कुडकुडत राहणार. शिवाय दोघांचा खर्च. त्यापेक्षा माहेरीच का राहीनास? म्हणून मी काही गेले नाही. मी कृष्णाकाठची वांगी खाल्ली तोवर यांनी तमसेकाठी बाजारचं खाल्लं. मोठे बालिष्टर होऊन आले. पुण्याला बस्तान बसवलं. पण माझ्यातली मेणोली काही गेली नाही.

**डॉक्टर:** हो. आता इतकी वर्षं बॅरिस्टरांना जवळून बघतोय म्हणून. नाहीतर हे साहेबी वागणं उपऱ्या माणसाला शिष्टपणाचं वाटतं.

**सावित्रीबाई:** मलाही आधी वाटलंच. पण तुम्हाला सांगू का, तसं सगळ्याच बाबतीत असतं. लहानपणापासून तुम्ही चित्पावन असलात तर ठीक. नाहीतर तो कद नेसून मळकट जानव्याशी चाळा करत नाकात बोलत फणसाची भाजी चिवडायची हेही शिष्टपणाचंच वाटतं.

**डॉक्टर:** बरोबर आहे.

**सावित्रीबाई:** पण काय झालं माहित नाही. ब्रिटिश जेंटलमन व्हायचं म्हणून करायची ती सगळी सोंगं केली. पण करता करता कुठेतरी ती आत झिरपली. हुशार होतकरू मुलगा म्हणून जाताना गेले होते. एक विचारी माणूस तिथून परत आला. एकूणात काय तर मला त्रास देत नाहीत आणि माझा करून घेत नाहीत. काही गोष्टी सांभाळून घ्याव्या लागतात, पण त्या आता असायच्याच. पोराचं जमलं नाही हे मात्र एक गालबोट आहे.

**डॉक्टर:** माई, तसं सगळीकडे यश कुणालाच मिळत नाही. कुठलीतरी बाजू लंगडी राहतेच.

**सावित्रीबाई:** खरं आहे. पण डॉक्टर, तुम्ही आधी चार घास खाऊन घ्या. इतक्या रात्रीची तुम्हाला धावपळ झाली.

**डॉक्टर:** (चवीने खात) कार्ल्याची भाजी छान आहे हो. मस्त कुरकुरीत लागते आहे.

**सावित्रीबाई:** नंदिनीच्या हातची आहे.

**डॉक्टर:** वा! (आणखी खात) माई, बाकी तुम्हाला कर्तबगार सून मिळाली.

**सावित्रीबाई:** हो. तनयला सांभाळून घेते, पण चिकटून बसत नाही. एकीकडे तिचं आपापलं काम धडाक्यात चालू असतं. वाचते खूप, लिहिते खूप. कसल्याशा पुस्तकासाठी अलिकडे टिपणं करते

आहे. बबडीला कुठे कुठे घेऊन जाते. तिघं एकमेकांना धरून असतात.

**डॉक्टर:** एकूण सगळं रुळलं आहे तर. (हनुवटी वर करून छतावर नजर फिरवतात.)

**सावित्रीबाई:** (तोंडाला पदर लावून हसत) असंच म्हणायचं! वरच्या मजल्यावर तिघांच्या तीन खोल्या आहेत. मी काही चौकशी करत नाही. दृष्टीआड सृष्टी!

**डॉक्टर:** अहो, हसताय काय अशा?!

**सावित्रीबाई:** बरीक कुतूहल असतं हो! पण आता असले प्रश्न काय पोटच्या पोरीला विचारत बसू?! तुम्हाला एक सांगू का डॉक्टर, नाही म्हटलं तरी थोडं कसंसंच वाटतं. आमच्या स्वयंपाकघरात एक मोठ्ठाला चांदीचा झारा आहे. डोळ्यासमोर फार स्पष्ट चित्रं यायला लागली तर तो असा पंख्यासारखा हलवून झाडून घेते! (अजून हसतातच आहेत.)

**डॉक्टर:** मी काय म्हणतो माई, ह्या बाबतीतल्या आवडीनिवडी ज्याच्या त्याच्या असणार. त्यातलं काही स्वत:ला हवंसं वाटलं पाहिजे असं नाही. त्यांचं त्यांना आवडलं म्हणजे बास झालं!

**सावित्रीबाई:** मीही तेच म्हणते! पण एक आहे मात्र. आपलं आणि समोरच्याचं सारखं असलं म्हणजे कुणाला काय हवं ते पटकिनी कळत असणार. हेवा वाटावा अशीच गोष्ट आहे हो. नाहीतर आम्हाला काय आवडतं याची एरवी पत्रास कोण करतो? आमच्या पिढीत बाईच्या फार अपेक्षा नसायच्याच. उपद्रव नाही झाला म्हणजे सुख मिळालं असं समजायचं.

**डॉक्टर:** बघा माई, एकदा आडून विचारून बघा. तेवढीच तुमच्या वाक्चातुर्याची कसोटी लागेल. आम्हालाही सांगा काय काय कळतं ते. तसं डॉक्टर माणसाला तरी यातलं सगळं कुठे माहित असतं? आपण आपलं आयुष्यभर किडुकमिडुक शिकत राहावं.

**सावित्रीबाई:** डॉक्टर! काय तुम्ही तरी?! वरणभात संपवा आधी. इतकं धीट संभाषण आपल्या वयाला फार वेळ झेपायचं नाही. पण आपसूक काही समजलं तर सांगेनच तुम्हाला. मी काय

म्हणतेय? इतक्या रात्री आता घरी परत नका जाऊ. आमची गेस्ट बेडरूम तयारच असते. आज इथेच झोपा, उद्या सकाळी तनयला एकवेळ बघून माझ्या हातचे कांदेपोहे खाऊन जा कुठे जायचं ते.

**डॉक्टर:** ठीक आहे.

**सावित्रीबाई:** बॅरिस्टरांचं धोतर देते तुम्हाला नेसायला.

**डॉक्टर:** बॅरिस्टर धोतर नेसतात?!

**सावित्रीबाई:** कुणी बघत नसेल तेव्हा नेसतात. अगदीच काही वीस शिलिंगी साहेब झालेले नाहीत.

३

(दिवाणखान्यात कोणीही नाही. मधुरा बॅडमिंटन खेळण्याच्या वेषात येते. हातातल्या रॅकेटला कव्हर आहे. दारापाशी एका स्टुलावर बसून बूट आणि मोजे काढून ठेवते. रावजी एका चांदीच्या थाळीत काचेचा उंच ग्लास घेऊन येतो.)

**रावजी:** मधुरा मॅडम, लेमोनेड इथे ठेवतो आहे.

**मधुरा:** थँक यू, रावजी.

**रावजी:** येस, मॅडम. (बूटमोजे आणि रॅकेट घेऊन आत जातो. आजूबाजूला नजर टाकून मधुरा अलमारीकडे जाते आणि एक गडद लाल रंगाचं पुस्तक बाहेर काढते. पुस्तकाची जाडी फार नसली तरी लांबीरुंदी ऐसपैस आहे. खुर्चीत रेलून बसून समोरच्या टेबलावर पाय ठेवून लेमोनेडचे घुटके घेत पुस्तक चाळू लागते. नंदिनी आत येते. आजूबाजूला नजर टाकून मधुराच्या जवळ जाते, तिच्या पापण्यांचं चुंबन घेते आणि किंचित जीभ बाहेर काढून घामाची चव घेते. मधुरा ह्याला विरोध करत नाही पण डोळे मिटून घेण्यापलिकडे प्रतिसादही देत नाही. मधुरासमोर बसून नंदिनी तिचे पाय आपल्या मांडीवर ठेवते, पण लागलीच मधुरा ते खाली काढून घेते.)

**मधुरा:** नको गं.

(नंदिनी काही न बोलता सरळ समोर पाहात शांतपणे बसून राहते. पंधरावीस सेकंद थांबून मधुरा पुन्हा दोन्ही पाय तिच्या मांडीवर ठेवते.)

**मधुरा:** चेप ना. (नंदिनी किंचित हसून तिचे पाय चुरू लागते.) आहा! काय छान वाटतंय. आज सॉलिड बॅडमिंटन खेळून झालं. पाय जाम दुखताहेत. (पुस्तक चाळत राहता राहता एकदम खुसखुसू लागते.)

**नंदिनी:** काय वाचते आहेस?

**मधुरा:** असंच. (पुस्तकाचं कव्हर दाखवते.) Winnie-the-pooh! पप्पा आणि मी लहानपणी एकत्र वाचायचो. मी फर्माईश केली की त्यांचा तो खास घोगरा इंग्लिश ॲक्सेंट काढून दाखवायचे! जुन्या कागदाचा वास आणि तो ॲक्सेंट. It was a deadly combination. काय मस्त वाटायचं! (नंदिनी तिच्याकडे रोखून पाहते आहे.) अगं, यात एक अस्वल असतं. अत्यंत मठ्ठ असतं —

**नंदिनी:** मधुरा, थापा मारू नकोस! मला तुझा चेहरा वाचता येतो. काय वाचते आहेस ते मुकाट्याने सांग! नाहीतर मी येतेच बघ तिथे— (हात लांब करून पुस्तक खेचून घेतल्याचा अभिनय करते. मधुरा किंचाळून पुस्तक मिटते, तसं त्यातून दुसरं एक पुस्तक खाली पडतं. नंदिनी ते उचलते.) कोकशास्त्र!

**मधुरा:** (तळहातांनी चेहरा झाकून घेत) धरणीमाते! मला पोटात घे —

**नंदिनी:** तू म्हणजे बाई चक्रमच आहेस! हे आणि कशाला वाचतेयस?

**मधुरा:** मग?! तुम्ही काय करता ते माझ्यासारख्या निरागस लेस्बियन युवतीला माहित व्हायला नको? चोरून चोरून मी सगळं इत्यंभूत वाचून काढते आहे. हे बघ. ह्यात लिहिलंय की म्हशीचं तूप,

दंतपाल तेल, मध आणि पांढऱ्या कमळाचे तंतू समप्रमाणात मिसळायचे. घरातली एक चिमणी पकडून आणून त्यात बुडवायची आणि ती ब्रशसारखी वापरून तो लेप पुरुषाच्या बेंबीत लावायचा म्हणजे त्याला जास्त वेळ धरून ठेवता येतं. असं काही करता का तुम्ही?

**नंदिनी:** नाही, असं करायची गरज नसते — (हसत हसत तीही दोन्ही तळहातांनी तोंड झाकून घेते. थोडा वेळ दोघी एकमेकींची नजर चुकवतात.)

**मधुरा:** (तिच्याकडे पाहात) कसं वाटतं?

**नंदिनी:** (अनिश्चित मान हलवते.) तुला पुस्तकी उत्तर देते. तो एक अनुभव आहे. मला आवडतो पण माझ्यातून तसाच्या तसा काढून तुला दिला तर तू नको म्हणशील. तो शब्दांत वर्णन करून सांगता येत नाही असं म्हणण्याचा प्रघात आहे, पण त्याला काही अर्थ नाही. घेण्यालायक सगळे अनुभव समोर मांडून ठेवले तर त्यांपैकी शंभरातले पंचाण्णव शब्दांत वर्णन करून सांगता येणार नाहीत.

**मधुरा:** मी कधी घेतलेला नाही पण मला आवडेल असं वाटत नाही. कसं असतं बघ. अमुक एक भाजी आपल्याला आवडेल का हे खाण्याआधी खात्रीने सांगता येत नाही. पण ह्यातलं कळतं. मला आधी वाटायचं की हा प्रकार इतक्या जणींना आवडतो मग आपल्याला का नकोसा वाटत असेल? पण एखादी गोष्ट बिलकुल न आवडणं हाही आपल्या व्यक्तिमत्त्वाचाच भाग असतो ना. म्हणजे कसं, की रंगमंचावर ह्या पाहा मधुरा जातेगावकर: मी तुम्हाला त्यांची ओळख करून देतो. ह्यांना कार्ल्याची कोरडी भाजी आवडते, पण रामफळ आणि बाईपुरुषांतलं आवडत नाही. का ते विचारू नका.

**नंदिनी:** हो. तसंच काहीसं. अर्थात त्यातल्या स्थानिक घडामोडी आपल्या आपण करून बघू शकतो. खरं तर जास्त कौशल्याने करून बघू शकतो. पण शेवटी तेवढंच नसतं ना. ते सगळं गाठोडंच असतं — दुसऱ्या शरीराची जवळीक असते, भावना गुंतलेल्या असतात.

**मधुरा:** म्हणून तुला आवडतं?

**नंदिनी:** तसं समज. पण आपल्या तुलनेत म्हणशील तर गडबडधडपड फार असते. त्यामुळे घेतल्यानंतर त्या अनुभवाची मनात पुनर्रचना करावी लागते.

**मधुरा:** धूर्त आणि पाताळयंत्री आहेस तू! (हे बोलता बोलता नंदिनीकडे जाऊन तिला बिलगून बसते.) खरं बोल. अशीच आपल्या संयुक्त अनुभवाची पुनर्रचना नाहीस ना करत तू?

**नंदिनी:** नाही! (मधुराचं चुंबन घेते.) करायचीच झाली तर एकमेकींना सांगूनसवरून दोघी मिळून करूयात. (पायात पाय गुंतवून दोघी काही वेळ नि:शब्द बसून राहतात.)

**मधुरा:** पण अवघड होतं गं कधी कधी. आज दुपारी —

**नंदिनी:** हो. अलिकडे तो फार लहरी झालाय.

**मधुरा:** म्हणून मी घरी नाहीच थांबले. क्लबमध्ये जाऊन खूप सणसणून खेळले.

**नंदिनी:** ते सगळंच माझ्या लक्षात आलं.

**मधुरा:** आत कुठेतरी मला शरम वाटते गं. माझा तो भाऊ आहे. मला त्याची असूया वाटायला नको. आणि आपण तिघे यात जाणूनबुजून आहोत. पण मन काबूत ठेवता येत नाही ना. अंगाला मुंग्या आल्यासारखं होतं — (नंदिनी तिचा हात हातात घेते.) डोळ्यासमोर फार स्पष्ट चित्रं यायला लागली तर मी बॅडमिंटनच्या रॅकेटने झाडून घेते!

**नंदिनी:** माझंही अवघड होतंच. आणि हे असं छापाकाटा करून तर ठरवता नाही येत —

**मधुरा:** नाही. तन्या म्हणाला तेच: आपलं ढुंगण स्वयंभू आहे. मापाची चड्डी बेतणं सोपं नाही.

**नंदिनी:** आणि तन्याकडे फार वेळही नाहीय आता. त्यामुळे मला वाटत राहतं की त्याचं मन मोडू नये. (मधुरा रडू लागते. नंदिनी तिला आणखी जवळ घेते.)

**मधुरा:** नको मोडूस. नंतर मला वाईट वाटेल.

**नंदिनी:** (थोडा वेळ नि:शब्द राहून) पण ते राहू दे आता. संध्याकाळी काय करूया ते सांग!

**मधुरा:** कुठलातरी वेळखाऊ आणि किचकट पदार्थ करूया! म्हणजे मला खूप वेळ तुझ्या मागे मागे हिंडता येईल. उकडीचे मोदक करायचे?!

**नंदिनी:** येस! चालेल!

**मधुरा:** मी आंघोळ करून घेते. सगळा घाम घाम झाला आहे.

**नंदिनी:** पाठ स्वच्छ करायला मदत लागणार नाही ना?

**मधुरा:** (मिश्किलपणे हसत) आता तुझा आग्रहच असेल तर —

**नंदिनी:** आहे ना आग्रह. (काही क्षण थांबून) मधुरा, विषय निघाला आहे तर एक विचारते. रागावू नकोस आणि त्याहीपेक्षा महत्त्वाचं म्हणजे एकदम किंचाळू नकोस. प्रॉमिस?

**मधुरा:** ओके. प्रॉमिस.

**नंदिनी:** स्पष्ट चित्रं तुला एकदा प्रत्यक्ष बघायची आहेत? अर्थात तन्याची संमती असेल तर —

**मधुरा:** (आधी गोंधळते. मग विचारमग्न होते.) हं! अशा प्रश्नाचं पटकन उत्तर देणं अवघड आहे. पण का? त्यानं काय साधेल?

**नंदिनी:** तुझं कुतूहल शमेल. तन्या म्हणत असला तर त्यालाही स्पष्ट चित्रं दाखवू. त्याचंही शमेल.

**मधुरा:** कुतूहल त्यालाही आहे?

**नंदिनी:** अर्थात.

**मधुरा:** तुला तसं म्हणाला?!

**नंदिनी:** अर्थात.

**मधुरा:** हं. As they say, curiouser and curiouser. पण समज, मला शिसारी आली तर?

**नंदिनी:** बाहेर जा.

**मधुरा:** विनोदी वाटलं तर?

**नंदिनी:** वाटलं तर वाटलं.

**मधुरा:** ठीक आहे. नंदी, आत्ताच्या घटकेला मी हो म्हणत नाही आणि नाहीही म्हणत नाही. विचार करून सांगते.

**नंदिनी:** (मान डोलावत) सांगोपांग विचार करून सांग. हो म्हणालीस तर मी तन्याला विचारते.

**मधुरा:** तोवर मी बसवण्णाला सांगून ठेवते पांढऱ्या कमळांची लागवड सुरू कर म्हणून. उपाय लागू पडला तर चित्र स्पष्टपणे मनावर उमटायला जास्त वेळ मिळेल.

**नंदिनी:** कल्पना चांगली आहे. पण तुला चिमणी पकडता येते का?

(मधुरा हसत हसत नकारार्थी मान डोलावत राहते. दोघी हातांत हात घालून वरच्या मजल्यावर जातात.)

३

(संध्याकाळची वेळ आहे. बॅरिस्टर आणि डॉक्टर आपापली वर्तमानपत्रं वाचताहेत. सहा महिन्यांची गरोदर नंदिनी गालिचावर मांडी घालून बसली आहे. सावित्रीबाई तिचे केस विंचरताहेत. तनय निर्विकार चेहऱ्याने खुर्चीवर स्वस्थ बसला आहे. त्याच्या शेजारी भिंतीला टेकवून ठेवलेली वॉकिंग स्टिक आहे.)

**सावित्रीबाई:** सूनबाई, पुस्तक लिहित होतीस ते कुठवर आलं?

**नंदिनी:** तीन वह्या भरून टिपणं तयार आहेत. शिवाय सुट्या कात्रणांचा पसारा खूप आहे. एकदाची बाळंत झाले की गादीत बसून सगळं एकटाकी लिहून काढीन. सहाव्या दिवशी सटवाई येईल त्या निमित्तानं मला नवं फाउंटन-पेन घेऊन द्यायचं सासरेबुवांनी कबूल केलं आहे.

**डॉक्टर:** कशावर लिहिते आहेस?

**नंदिनी:** महाराष्ट्रातल्या कामगार चळवळीचा इतिहास लिहिते आहे. माथाडी कामगार संपाचं निमित्त झालं. मग त्याआधीचं कम्युनिस्टांचं काम, सत्यशोधक समाजाचं काम असा धागा पकडून मागे मागे जात राहिले तशी पुष्कळ माहिती मिळत गेली. नारायण मेघाजी लोखंडे हे यातले आद्यपुरुष, त्यामुळे पुस्तकाची सुरुवात त्यांच्यापासून करणार आहे. मुंबईला एका कापड गिरणीत स्टोअरकीपर होते. तिथल्या कामगारांचे जे हाल व्हायचे ते ह्यांच्या डोळ्यांसमोरच व्हायचे. भयंकर उकाड्यात रोज तेराचौदा तास हातमाग चालवायचा. दुपारचं जेवण आणि शी-शू ह्या सगळ्याला मिळून मध्ये पंधरावीस मिनिटं मिळाली तर मिळाली. सुट्ट्या नसायच्या. कामात चूक झाली, तागा खराब निघाला तर मालक पगारातून कापून घ्यायचा. मग लोखंडेकाकांनी गिरणी कामगारांची संघटना केली. दर आठवड्याला एक लंगोटीपत्र काढायचे. त्याला 'दीनबंधू' असं हृदयाला पीळ पाडणारं नाव ठेवलं होतं. तिथेही तोटा व्हायचाच. इकडे गिरणीमालकांची वेगळी संघटना होती तिचा उलट दट्ट्या असायचा. एकूण काय तर गणपतीच्या मेळयासाठी साने गुरुजींनी लिहावी तशातली रडारड कथा आहे.

**सावित्रीबाई:** ही सगळी केव्हाची गोष्ट?

**नंदिनी:** जोतिराव फुल्यांच्या नंतरच्या पिढीतले. म्हणजे अठराशे ऐंशी-पंच्याऐंशीचा काळ. पण फार रुक्ष विषय आहे हो. कुठे बॉंबस्फोट नाहीत की संडासाच्या भोकातून खाली जाऊन समुद्रात पंधरा मिनिटं पोहणं नाही. अमुक संघटनेचे ठराव, मायबाप इंग्रज सरकारपुढे तमुक निवेदन असलीच सगळी पानभरती आहे. पण नाही म्हणायला एक गंमतीदार नैतिक प्रश्न समोर आला.

**डॉक्टर:** सांग ना.

**नंदिनी:** म्हणजे समजा एखाद्यानं एक कृती अप्पलपोटेपणानं केली पण त्यातून आपसूक दुसऱ्याला फायदा झाला, तर त्या कृतीची कितपत वाखाणणी करायची? काय झालं ते सांगते. हा अठराशे साठ-सत्तरचा सुमार. मुंबईच्या ह्या कापड गिरण्यांमध्ये आठदहा वर्षांची पोरं कामाला असायची. त्यांना दिवसभर चोपून घेऊन वर मजुरी कमी द्यायचे, त्यामुळे कापड स्वस्तात विणून व्हायचं. परिणामी इंग्लंडमधल्या गिरणीमालकांचं पोट दुखायला लागलं. तिकडचे फॅक्टरी ॲक्ट्स जास्त कडक असल्यामुळे त्यांना असं काही करता यायचं नाही. मग त्यांनी दबाव आणून इथे भारतातही एक फॅक्टरी ॲक्ट पास करून घेतला. यामुळे इथल्या कामगार पोरांचा एका अर्थाने फायदा झाला, कारण त्यांचे काबाडकष्ट हलके झाले. पुढे मोठा होऊन जो माणूस चाळीसाव्या वर्षी टीबीने मेला असता तो पंचेचाळीसाव्या वर्षी मरायला लागला. पण दुसऱ्या अर्थाने तोटा झाला कारण कामाचे तास कमी झाल्यामुळे मिळकतही कमी झाली. पण मी म्हणेन की आणखी पुढे जाऊन तिसऱ्या अर्थाने उलट फायदाच झाला. कारण सुरवातीचा फॅक्टरी ॲक्ट जरी फार हिणकस असला तरी निदान त्याच्यावर कागदोपत्री शिक्कामोर्तब झाल्यामुळे त्यापेक्षा जास्त बरा ॲक्ट पुढे केव्हातरी पास व्हायला एका प्रकारे दार उघडलं गेलं. असं सगळं ते आहे. श्रेय कुणाला द्यायचं आणि दोष कुणाला द्यायचा हे पटकन कळत नाही. तन्यापाशी हा विषय काढला की त्याला किल्ली बसते. मग तो consequentialism आणि deontology वगैरे शब्द वापरून पुढे सुरू करतो.

**तनय:** हो. एकेकाळी थोडीफार फिलॉसॉफी वाचली ती आता उपयोगी पडायला लागली आहे. When my troubles were small, I was a whiner. Now that they are large, I have

become a stoic.

**बॅरिस्टर:** दुखतं का रे?

**तनय:** सतत.

(काही काळ शांतता. एका चांदीच्या ट्रे वर निळा लखोटा आणि कात्री घेऊन रावजी येतो. बॅरिस्टर बसले आहेत त्यांच्याशेजारी टेबलावर ठेवतो.)

**रावजी:** सर, हा दुपारच्या डाकेने आला.

**बॅरिस्टर:** थँक यू, रावजी.

**रावजी:** येस, सर. (जातो.)

**बॅरिस्टर:** डॉक्टर, हा तुमच्यासाठी आहे.

(डॉक्टर लखोटा उघडून आतला कागद वाचतात. स्वत:शी हसतात आणि नंदिनीच्या कानात काहीतरी सांगतात. तीही स्वत:शी हसते.)

**डॉक्टर:** माई, तुम्हाला नातू होणार की नात ह्यावर प्रयोगशाळेतून रिपोर्ट आला आहे.

**सावित्रीबाई:** अहो, मग सांगा ना! ताणून कसलं धरताय?!

**डॉक्टर:** नंदिनीला कानात सांगितलं आहे. ती सगळ्यांना एकदमच सांगेल. (ग्रॅन्डफादर क्लॉककडे पाहात) मधुरा मुंबईहून यायचीच फक्त खोटी आहे. एव्हाना डेक्कन क्वीन आली असणार.

**बॅरिस्टर:** बसवण्णाला मी गाडी घेऊन स्टेशनवर जायला सांगितलं आहे. डेक्कन क्वीन नेहमी

वेळेवर येते.

**सावित्रीबाई:** (घड्याळाकडे बघतात.) मग आता काही उशीर नाही. पण डॉक्टर, प्रयोगशाळेला कसं कळतं? आमच्या मेणोलीला एक आलवणातली बाई होती. पोटाची गोलाई कुठून कशी आहे ते निरखून बघून सांगायची. शेरभर तांदूळ आणि सव्वा रुपया घ्यायची.

**नंदिनी:** पण बरोबर सांगायची का?

**सावित्रीबाई:** आता अधीमधी चुकायचं. पण तेवढ्याचं काय? भावाकडे आश्रित म्हणून राहायची. तेवढाच तिला आधार होतो म्हणून लोक आपले बोलवत असत. पण डॉक्टर, तुम्हाला कसं कळलं ते सांगा.

**डॉक्टर:** माई, ते थोडं किचकट आहे पण गोळाबेरीज पद्धत सांगतो. असं बघा की आपल्या शरीरात हजारो-लाखोंच्या संख्येने पेशी असतात. तर यातली प्रत्येक पेशी म्हणजे एक लहानशी पिशवी समजा. ह्या पिशव्या एकमेकींवर रचून आपला प्रत्येक अवयव बनवलेला असतो.

**सावित्रीबाई:** प्रत्येक अवयव?

**डॉक्टर:** प्रत्येक अवयव. हात-पाय-पोट-डोकं सगळं. ह्याच पिशव्या रक्तातसुद्धा पोहत असतात. तर आता मुद्द्याची गोष्ट म्हणजे यापैकी प्रत्येक पिशवीत दुपेडी सुंभ ठेवलेले असतात.

**सावित्रीबाई:** सुंभ?!

**डॉक्टर:** हो. काथ्याचे सुंभ असतात तसेच थोडेसे हेही दिसतात. पण अतिशय लहान कणांचे बनवलेले असतात, त्यामुळे प्रयोगशाळेत भिंगाखाली बघावे लागतात. तर आता मेख अशी की बाईच्या शरीरातले आणि पुरुषाच्या शरीरातले सुंभ वेगवेगळे दिसतात. पण हे ओळखायला त्यातला माहितगार माणूस पाहिजे. म्हणजे असं पाहा माई की स्वयंपाकात तुमची नजर बसलेली आहे, त्यामुळे बासमती तांदूळ आणि चमेली तांदूळ यांतला फरक तुम्हाला पटकन ओळखू येतो.

बरोबर की नाही? तर प्रयोगशाळेतल्या माणसांची नजर अशीच बसलेली असते. त्यामुळे बाईच्या शरीरातले आणि पुरुषाच्या शरीरातले सुंभ त्यांना पटकन वेगळे ओळखू येतात.

**सावित्रीबाई:** थोडं थोडं समजतंय! छान सांगता हो तुम्ही.

**डॉक्टर:** तर याचा उपयोग कसा करतात ते सांगतो. नंदिनीचं बाळ आत्ता तिच्या पोटात आहे. त्या बाळाच्या अंगातले काही सुंभ विलग होतात आणि वारेतून उलट्या दिशेने नंदिनीच्या अंगात झिरपत राहतात. म्हणून आपण तिचं थोडंसं रक्त काढून घेऊन प्रयोगशाळेत पाठवून दिलं. त्यातले नंदिनीच्या स्वत:च्या अंगचे सुंभ आणि बाळाकडून आलेले सुंभ पहिल्यांदा वेगळे वेगळे करायचे. एकदा हे झाल्यानंतर बाळाकडून आलेले सुंभ तेवढे निरखून पाहिले की मुलगा आहे की मुलगी आहे ते सांगता येतं.

**सावित्रीबाई:** सोपं आहे हो! ही प्रयोगशाळा कुठेशी असते मला पण सांगून ठेवा! मी मुरलीधराला जाते तिथल्या कितीतरी बायका माझ्या ओळखीच्या झाल्या आहेत. त्यांनाही उपयोग होईल.

**बॅरिस्टर:** पूल ओलांडलात की लगेच डावीकडे एक लाल विटांची इमारत आहे. सापडायला अगदी सोपी आहे.

**सावित्रीबाई:** (विचारात पडतात. तळहातावर आकृती काढून बघतात.) काही लक्षात येत नाहीय बाई. लकडी पुलावरून मी हजारदा गेले असेन. पण अशी इमारत कुठे दिसली नाही हो.

**तनय:** आई, आबा तुझी थट्टा करताहेत. तो लकडी पूल नव्हे.

**सावित्रीबाई:** मग कुठला पूल?

**तनय:** टॉवर ब्रिज. तमसा नदीवर आहे.

**डॉक्टर:** माई, अशी काही प्रयोगशाळा अजून आपल्या देशात नाहीय. त्यामुळे बॅरिस्टरांच्या

ओळखीनं आपण नंदिनीचं रक्त जहाजाने लंडनला पाठवून तपासून आणलं.

**सावित्रीबाई:** बाई गं! एवढा आटापिटा कशाला करायला हवा?! आणि खर्च केवढा आला असेल तो. तीनेक महिन्यांत आपसूकच कळलं नसतं का?

**तनय:** आई, माझ्याकडे तेवढा वेळ आहे याची खात्री वाटत नाही. जाण्यापूर्वी मला माहित करून घ्यायचं होतं.

(थोडा वेळ कुणी काही बोलत नाही. मधुरा आणि बसवण्णा आत येतात तसे सगळेजण वेगवेगळ्या आविर्भावांत तिचं स्वागत करतात. नंदिनी जमिनीला टेकू देऊन सावकाश उठते. तनय आधाराला काठी घेऊन उभा राहतो. मधुरावर मिठ्या आणि पाप्यांचा वर्षाव होतो. मधुराच्या कानाशी काहीतरी पुटपुटून बसवण्णा लगबगीने गायब होतो.)

**मधुरा:** (समोर एक चषक ठेवते. त्यात एक लाल पुडकं आहे.) पप्पा आणि मम्मा! हा चकचकीत चषक मी आपल्या चरणी अर्पण करते. बॉम्बे जिमखान्याची सिंगल्स टूर्नामेंट जिंकून आले! फिरंगी रॅकेटनं साथ दिली.

(सगळेजण उत्साहाने टाळ्या वाजवतात.)

**सावित्रीबाई:** बबडे, फायनल आज दुपारीच होती ना?

**मधुरा:** हो. कुलाब्याच्या झीझी खंबाटाबरोबर होती. फार छान खेळली. तिची रॅकेट जपानी होती. पहिला गेम तिनं घेतला आणि दुसरा मी घेतला. तिसऱ्यात आम्ही दोघींनीही खूप जोर केला. पण गेमच्या मध्यावर कुठेतरी बिचारीनं माझा एक शॉट सोडून दिला तो लॉबीच्या अगदी गुंजभर आत पडला. ती संधी साधून मी नाक पुढे काढलं आणि ढकलाढकली करत इलेव्हन-एटनं जिंकले. She was very gracious about it. मला म्हणत होती एक दिवस माझ्याच घरी राहा, तुला मुंबई दाखवते म्हणून. पण इथल्या सगळ्यांची फार आठवण आली गं. म्हणून मग मी बक्षीस समारंभ झाल्या झाल्या व्हीटीला जाऊन थडकले. पप्पांनी शॉपिंगला दिलेले सगळे पैसे तसेच्या तसे परत

आणले. इच्छाच नाही झाली.

**सावित्रीबाई:** आणि हे पुडकं कसलं?

**मधुरा:** येताना डेक्कन क्वीनमध्ये जमशेद भेटला. त्याने बाळासाठी नवे कपडे दिले आहेत. खास पारशी डिझाईनचे.

**तनय:** बबडे, तू आलीस तेव्हा आमचा तोच विषय चालू होता. पास-नापास कळलेलं आहे. आम्हा कुणालाच माहित नाही. नोनो सगळ्यांना एकदमच सांगणार आहे.

**मधुरा:** येस! स्टेशनवरून येताना मला बसवण्णाने बातमी दिली. तो म्हणाला की दुपारच्या डाकेनं एक फिकट निळ्या रंगाचं पाकीट आलं आहे. पाकिटाला स्टँप्स चिकटवले आहेत पण त्यांच्यावर कुठल्याच देशाचं नाव लिहिलेलं नाही त्यामुळे कुठून आलंय ते कळत नाही. एवढ्यावरून मला ताबडतोब कळलं कुठून आलंय ते! (नंदिनी काही बोलू लागणार तोच —) नंदी, फक्त एक मिनिट थांब! बसवण्णा परत येतो आहे —

**नंदिनी:** बरं बाई!

(आधी रावजी आणि त्याच्यापाठोपाठ बसवण्णा येतो. रावजीच्या हातात एका ट्रेवर बोन चायनाचा मोठा वाडगा आहे. बसवण्णाच्या हातात वेताची टोपली आहे. त्यातून तो एक निळा आणि एक गुलाबी पुष्पगुच्छ काढून नंदिनीसमोर एकेका हातात एकेक धरतो.)

**बसवण्णा:** मॅडम, आता सांगा!

**नंदिनी:** (त्याच्या हातातून गुलाबी पुष्पगुच्छ घेत) मला मुलगी होणार आहे! (सगळेजण टाळ्या वाजवतात. आता तिच्यावर मिठ्या आणि पाप्यांचा वर्षाव होतो.)

**मधुरा:** नंदीनं आणि मी ठरवलंय की बाळाचं नाव ठेवायचा हक्क तन्याचा असणार. तो आपल्याला

आत्ताच सांगणार आहे. कारण —

**तनय:** हो. माझ्या मनात तसं पक्कं आहे, पण तरीदेखील पुन्हा एकदा मिनिटभर विचार करतो.

**बसवण्णा:** तनयसर विचार करतंय तोवर थोडंसं स्वीट खाऊन घ्या म्हणतो मी! (रावजी चांदीच्या चमच्याने प्रत्येकाच्या तळहातावर थोडं थोडं वाढतो.) बेळगावचं कुंदा आणलं आहे. असल्या ऑकेजनला अगदी फिट बसतंय की हो. कुंदा शब्द म्हटलं तर मराठीत पुल्लिंगी पण असतंय आणि स्त्रीलिंगी पण असतंय. रिझल्ट काही पण लागलं तरी चालतंय की!

**डॉक्टर:** (तळहात चाटून पुसून खात) फक्कड चव आहे.

**बसवण्णा:** असं प्रिप्रेशन फक्त बेळगावातच जमतंय हो. इथे पुण्यात कुणाला पण नॉलेज नाही बघा.

**सावित्रीबाई:** ठीक आहे बाबा, तू म्हणतोस तर तसं. मार टोमणे!

**तनय:** आबा, आई, सगळे. मी दोन्ही नावं ठरवली आहेत; आवडतात का सांगा.

**बॅरिस्टर:** दोन्ही?

**तनय:** दोन्ही. माझ्यानंतर आपल्या बंगल्याचं नाव बदलून टाका कारण त्यातला 'त' ठेवायचं काही कारण उरलेलं नसेल.

**बॅरिस्टर:** अरे पण —

**तनय:** प्लीज बदलून टाका. आणि कुटुंबातले सगळेजण नव्या नावात सामावून घ्यायला हवेत. मुलीचं नाव आपण 'गार्गी' ठेवूया, आणि बंगल्याचं नवं नाव 'सामगायन' असं ठेवूया: सावित्री-मधुरा-गार्गी-यदुनाथ-नन्दिनी.

**बॅरिस्टर:** दोन्ही छान आहेत. मला फार आवडली.

**डॉक्टर:** सगळ्यांनाच आवडली आहेत. चेहऱ्यांवर दिसतंच आहे.

**तनय:** बंगल्याचं नाव 'सामगायनं' असं ठेवलंत तरी चालेल. टिळक इथून जवळच राहायचे, त्यामुळे आपल्याला अनुस्वारित 'नंदिनी' चालेल किंवा 'न' मोडलेली 'नन्दिनी' चालेल.

**मधुरा:** तन्या, इतकी गुंतागुंत कशाला वाढवायची? मला वाटतं नुस्तं 'सामगायन' असंच नाव छान आहे. आधीच आपण सानुनासिक शहरात राहतो. त्यात उगीच माकडाच्या हाती कोलीत देऊया नको.

**सावित्रीबाई:** मग ठरलं तर. दोन्ही नावं गोड आहेत! मनातल्या मनात गुणगुणत राहावीत अशी आहेत.

**नंदिनी:** 'गार्गी' आणि 'सामगायन'. कशी वैदिक आणि गूढरम्य वाटतात!

**तनय:** हो ना. मागेच जायचं तर थोडंथोडकं कशाला? तीन हजार वर्षं का नको?

**नंदिनी:** तन्या, पोरगी मोठी झाली की एखाद्या मुंडण केलेल्या तिरसट गुरूकडे पाठवून तिला सामगायन शिकवूनच आणायचं. अवघड गोष्ट जमायला लागली की मजा येते. (तनय नि:शब्दपणे हसतो.)

**बसवण्णा:** बॅरिस्टरसर, एक रिक्वेष्ट आहे बघा.

**बॅरिस्टर:** बोल, बसवण्णा.

**बसवण्णा:** मी मायसोर कंट्री क्लबात चीफ गार्डनर होतं तिथलं क्लबाचं चीफ कॅबिनेट मेकर माझं दोस्त असतं. बंगल्याचं नवीन लेटरिंग ते टॉप ग्रेड मायसोर सँडलवूड मध्ये कार्व्हिंग करून देईल

बघा. चंदनचं लाकूड म्हणजे बेष्ट चॉईस! किती पण वर्ष गेलं तरी फ्रेग्रन्स टिकून राहतं.

**बॅरिस्टर:** थँक यू, बसवण्णा. छान कल्पना आहे.

**रावजी:** माझी पण एक रिक्वेस्ट आहे, सर.

**बॅरिस्टर:** बोल, रावजी.

**रावजी:** बंगल्याचं जुनं लेटरिंग टाकून देऊ नका. माझ्याकडे सांभाळायला द्या. आय ॲम व्हेरी अटॅच्ड टु इट. (रडू लागतो. त्याची समजूत कशी घालावी ते कुणाला कळत नाही.)

३

(रात्रीचे अकरा वाजले आहेत. अंगात एक ढगळ गाऊन घालून नंदिनी दिवाणावर पहुडली आहे. मधुरा तिच्या शेजारी बसली आहे. टेबलाचा आधार घेऊन उभा असलेला तनय तिघांसाठी ड्रिंक्स तयार करतो आहे. तो खूप आजारी आणि अशक्त असल्याचं त्याच्या हालचालींवरून स्पष्ट व्हावं.)

**नंदिनी:** दमले बाई!

**मधुरा:** हो ना. मला तर तुझ्या कवायतींकडे नुस्तं बघूनच दमायला झालं.

**नंदिनी:** पण माझ्या प्रयत्नांना शेवटी फळ आलं. सात पाउंड एक औंस वजनाची पोटची गोळी सुखरूप बाहेर निघाली.

**मधुरा:** गोळीकडे बघताक्षणीच मी प्रेमात पडले. पुढची वीस वर्षं मी तिचे सॉलिड लाड करणार आहे.

**नंदिनी:** दमणूक झाली, पण छान वाटतंय.

**मधुरा:** मला पण.

**तनय:** नोनोच्या पोटच्या गोळीचा, उर्फ आपल्या सर्वांच्या लाडक्या गारगोटीचा, उर्फ गार्गीचा आज पृथ्वीतलावरचा पहिला दिवस आहे. आणि तिच्या उर्वरित आयुष्याचाही पहिला दिवस आहे. This calls for a celebration.

**नंदिनी:** जन्मल्या जन्मल्याच बिचारीच्या नावाची मोडतोड सुरू झाली.

**मधुरा:** येस. आपल्या घराचं वळणच तसं आहे.

**तनय:** बबडे, some cream sherry for you. नोनो, तुझ्यासाठी मंडईतल्या ताज्या मोसंब्यांचा रस. आणि माझ्यासाठी बोटभर स्कॉच. किंवा, कदाचित, दोन बोटं स्कॉच.

**मधुरा:** तन्या, सांभाळून.

**तनय:** असू दे गं. या घटकेला काही फरक पडायचा नाही. (दोघींना त्यांचे ग्लासेस देऊन काठीचा आधार घेत नंदिनीच्या दुसऱ्या बाजूला बसतो. तिघेही न बोलता ग्लासला ग्लास भिडवतात.)

**नंदिनी:** (रसाची चव तोंडात घोळवत) नव्या सवयी जडत चालल्या होत्या त्या पुन्हा बदलाव्या लागल्या.

**मधुरा:** अजून वर्षभर समज.

**नंदिनी:** ते आता गार्गीच्या लहरीवर आहे.

**मधुरा:** (क्रीम शेरी नंदिनीच्या नाकाजवळ नेते.) नुसती हुंगून बघायला हरकत नाही.

**नंदिनी:** (नाक भरून वास घेत) छान वास येतोय गं.

**मधुरा:** तुला पण.

(तिघेही आरामात रेलून घुटके घेत राहतात. बॅरिस्टर आत येतात. ते हाउस-गाऊनमध्ये आहेत. हातात एक ब्रीफकेस आहे.)

**बॅरिस्टर:** अरे! नवी पिढी इथे जमलेली दिसतेय.

**नंदिनी:** आम्ही यथाशक्ती सेलिब्रेशन करतो आहोत. आबा, do have a nightcap with us! पण इतक्या उशीरा तुम्ही जागे कसे काय?

**बॅरिस्टर:** (स्वत:साठी थोडीशी स्कॉच ओतून घेत) मोटवानीच्या केसवर काम करत होतो. खरं सांगायचं तर मला त्याचा कंटाळा यायला लागला आहे. केसचाही आणि माणसाचाही. पण मध्येच सोडून देता येत नाही ना. ह्या खटल्याचा एकदा सोक्षमोक्ष लागला की असल्या अप्रिय अशिलांशी संपर्क तोडूनच टाकावा म्हणतो. आयुष्यात खूप पैसे मिळवून झाले. बास झालं! यापुढे आता मी फक्त निरपराध लोकांचंच वकिलपत्र घेणार आहे.

**मधुरा:** पप्पा, असं नका करू. गार्गीचं सगळं शिक्षण अजून व्हायचं आहे.

**बॅरिस्टर:** बबडे, त्याची काळजी करू नकोस. आपल्याकडे खूप आहेत.

**मधुरा:** बघा हं! तुमच्यावर भिस्त ठेवून राहतेय.

**बॅरिस्टर:** बेशक राहा. (नंदिनीला उद्देशून) माझी नात झोपली का व्यवस्थित?

**नंदिनी:** हो. अर्थात रात्री केव्हातरी उठून सामगायन सुरू करेलच. पण आबा, स्त्रीराज्यातल्या काही घडामोडी वर्णन करून सांगायला अडचणीच्या असतात. तेव्हा त्यांत शिरूया नको. कल्पनेने समजून घ्या—

**बॅरिस्टर:** बरोबर आहे तुझं. Let us keep it Victorian.

**तनय:** पण एवीतेवी स्त्रीराज्यात राहायची आबांना आता सवय करून घ्यावी लागेल. चार बायकांच्या घरात त्यांचा एकुलता पुरुष लांबोडा होणार आहे.

(काही क्षण अवघड शांतता.)

**मधुरा:** पप्पा, मी आणि नंदी झोपून टाकू? खूप दमणूक झाली आहे. उद्या सकाळी किंवा दुपारी किंवा संध्याकाळी भेटू.

**बॅरिस्टर:** Of course. Goodnight, my girls.

**नंदिनी:** Goodnight, आबा.

**मधुरा:** Goodnight, पप्पा. आणि तन्या, तूही फार जागू नकोस.

**तनय:** नाही जागत. Goodnight, dears.

(तनयच्या आणि बॅरिस्टरांच्या कपाळाचं चुंबन घेऊन दोघी हातात हात घालून आत जातात. ते दोघे एकमेकांकडे थेट न पाहता काही क्षण अबोलपणे स्कॉच पीत राहतात.)

**बॅरिस्टर:** कसा आहेस?

**तनय:** (अनिश्चित मान हलवतो पण थोडा वेळ काही बोलत नाही. क्षणभर डोळे मिटून घेऊन चेहरा शांत करण्याचा प्रयत्न करतो.) चांगली बातमी अशी काही नाही.

**बॅरिस्टर:** Sorry to hear that. तुझ्यासाठी भेटवस्तू आणली आहे. मला नात दिल्याबद्दल. खूप

वर्षांपूर्वी घेऊन ठेवली होती. (ब्रीफकेस उघडून कातडी बांधणीचं एक जुनं पुस्तक त्याला देतात.) एडवर्ड फिट्झजेरल्डच्या 'रुबायत' ची लिमिटेड एडिशन आहे. कवितेत मला फार गम्य नाही, पण तुला आहे. मी लंडनला असताना तिथे एक 'उमर खय्याम क्लब' होता. 'रुबायत' मधल्या कविता आणि आयुष्याबद्दलचा एकूणच तो पवित्रा ह्या सगळ्याचा जबरदस्त पगडा मनावर असलेली ही मंडळी होती. मिडल टेंपलमधला माझा एक मित्र त्यांच्यात असायचा. दिवसा वकिली, रात्री कविता. तेव्हाच केव्हातरी ही शंभर प्रतींची आवृत्ती क्लबने छापून घेतली. It was meant for private circulation. वशिला लावून मी पण एक घेतली. आतला बुकमार्क फार छान आहे. केशरी रंगाचा एक धागा बाइंडिंगमध्ये शिवून टाकून त्याच्या दुसऱ्या टोकाला जांभळ्या रंगाची मखमली थैली बांधली आहे. They chose classic Oriental colours. थैलीत ग्लेनद्रोनाखची छोटी बाटली आहे. सांभाळून काढ. It's a 21-year old Cask Strength Limited Edition. Hope you like it.

**तनय:** Thank you, आबा. It means a lot to me.

**बॅरिस्टर:** And you know, I am sorry for —

**तनय:** It's all right.

**बॅरिस्टर:** Okay. Goodnight then. फार वेळ जागू नकोस.

**तनय:** नाही जागत. Goodnight, आबा.

(बॅरिस्टर जातात. तनय तिथेच थांबतो.)

३

(दिवाणखान्यात आता फक्त झुंबरातून येणारा प्रकाश आहे. तनय एकाग्रतेने पुस्तकाची पानं उलटतो आहे.)

**तनय:** आहा! (कविता आवडली आहे अशा आविर्भावात मान डोलावत) अस्मादिक, कान देऊन ऐका.  उमर खय्यामला सुरईत घुसळून एडवर्ड फिट्झजेरल्डने पृष्ठभागावर आणलेली रुबाई क्रमांक एकूणपन्नास:

It's all a chequer-board of nights and days!

अरेच्या! हा काय समोरच आहे! अभिधा असताना लक्षणा कशाला हवी? (उठून बुद्धिबळाच्या संचाकडे जातो.) चेस-बोर्डवरच्या पात्रांना हलवून आपण त्याचा चेकर-बोर्ड करूया. (बुद्धिबळाच्या पटावरचे सगळे मोहरे बाजूच्या टेबलावर ठेवून पट रिकामा करतो. पुढली काही मिनिटं ह्या पटाचा टेबल म्हणून वापर होईल.)

It's all a chequer-board of nights and days
Where destiny with men for pieces plays
Hither and thither moves, and mates and slays
And one by one, back in the closet lays.

It is a quatrain, love. यमकांची अशी रचना जमवायला अंमळ अवघड असते:

days-plays-slays-lays

अडगुलं-अडगुलं-अडगुलं-अडगुलं. A-A-A-A.

चार-ओळी. ही चार-ओळी आहे. चारोळी आहे. पण कवितेची चव चारोळीसारखी नाही. कवितेची चव कडू आहे. तोंड कडू होतं. तसं नको. तोंडची ही चव पुसून टाकायला हवी. रुचिपालट करायला हवा. सुदैवाने रुचिपालट करण्याची सोय आहे. (पुस्तकातला धागा हाताळतो. थैली उघडून स्कॉचची बाटली पटावर सावकाश ठेवतो. तिच्यावर डकवलेली चिठ्ठी वाचतो.)

Glendronach. ग्लेन-द्रोनाख. द्रोनाख-दरी. सुंदर, सुरम्य स्कॉटलंडमधली ही पाहा द्रोनाख-दरी. ग्लेन-द्रोनाख. (काहीसा अतिशयोक्त स्कॉटिश हेल काढून 'ख' म्हणण्याचा प्रयत्न करत, खाकरत-

खोकरत हा शब्द पुन्हा पुन्हा उच्चारतो. या प्रयत्नात त्याला ढास लागते पण सावरतो.) बापरे! शब्द धोकादायक आहे. जपून उच्चारायला हवा. (यानंतर तोच शब्द मृदु आवाजात 'ख' म्हणत उच्चारतो.) तर ह्या दरीतली दारू. (एका क्रिस्टल ग्लासमध्ये बाटली उपडी करतो. ग्लास नाकाशी धरून हुंगतो आणि चव घेऊन पाहतो.) चवींच्या लाटा येताहेत. एकामागून एक. (किंचित थांबत थांबत एकेक चव ओळखतो.) मनुकेची चव. दालचिनीची चव. तापवलेल्या काळ्या गुळाची चव. (हे म्हणत असताना सतत स्कॉच पितो आहे.)

अस्मादिक, पुढे ऐका. रुबाई क्रमांक एक्कावन्न:

The moving finger writes; and having writ,
Moves on: nor all thy piety nor wit
Shall lure it back to cancel half a line
Nor all thy tears wash out a word of it.

This too is a quatrain, love. पण यमकरचना थोडी वेगळी आहे:

writ-wit-line-it

अडगुलं-अडगुलं-मडगुलं-अडगुलं. A-A-B-A.

(शेवटचा घोट घेतो.) संपली. दारू संपली. दरीतली दारू संपली. पण दारूची बाटली मात्र मोठी घाटदार आहे बरं का. (ती उचलून निरखून पाहतो.) थैलीत जपून परत ठेवून देऊया. (बाटली ठेवू लागतो.) अरेच्या?! हाताला काहीतरी निमूळतं लागतंय. आत दुसरी एक बाटली आहे की काय? (थैलीत हात चाचपडून आतली वस्तू बाहेर काढून पटावर ठेवतो.) हं! Curiouser and curiouser. (हे Pattern 1853 Enfield Rifle-Musket चं काडतूस आहे.) वस्तू धोकादायक आहे. जपून हाताळायला हवी! आबांनी बंदूक विकत घेतली तेव्हा हे देखील घेतलं असणार. इथे ठेवून विसरून गेलेले दिसतात. कुणास ठाऊक.

(काडतूस पटावर उभं करतो. मान तिरपी करून त्यावर लिहिलेली अक्षरं वाचतो.) The Royal

Gunpowder Mills, Lea valley, England. ली-व्हॅली. ली-दरी. आबांच्या आवडत्या इंग्लंडमधली ही पाहा ली-दरी. (काडतूस हातात घेऊन चाटून पाहतो.) चवींच्या लाटा येताहेत. एकामागून एक. सिगरेटभोवतालच्या कागदाची चव. मधमाशांनी रिकाम्या केलेल्या पोळ्यातल्या मेणाची चव. हं! पण तिसरी चव नीट ओळखू येत नाहीय. फोडणीच्या डुकराबरोबर साधी गोमाता की साध्या डुकराबरोबर फोडणीची गोमाता? अशीच काहीशी चव. (भिंतीकडे जाऊन तिथली बंदूक खाली काढून घेऊन येतो. दातांनी काडतूस फाडून आतली दारू बंदुकीच्या नळीत सावकाश ओततो.) दरीतली दारू अजून शिल्लक होती! (कागदी आवरणातली शिशाची गोळी नळीत टाकून बंदुकीला लावलेली सळई आत खुपसून गोळी घट्ट बसवतो.) आता ऐका, अस्मादिक यदुनाथ जातेगावकर ह्यांनी रचलेली एक अप्रकाशित रुबाई:

The moving bullet; having done its deed
Moves no more: and disgorges its speed
Into coagulations of soft flesh; which enclose,
Lovingly, the contours of a deadened seed.

A-A-B-A. आऽबा.

(बंदुकीची नळी तोंडात धरतो आणि दोर खेचून झुंबराचा दिवा मालवतो. दिवाणखान्यात पूर्ण अंधार आहे. गोळी झाडल्याचा आवाज.)

❊ ❊ ❊